सर्वांचे आर्यभट इतर कोणत्याही सिद्धांतांत आढळत नाहीत. ते यांत आहेत, हा यांत विशेष आहे.

## पहिला आर्यभट.

याचा आर्यभटीयनामक प्रसिद्ध ग्रंथ आहे. उपलब्ध असलेल्या पौरुष ज्योतिषग्रंथांत याच्याहून प्राचीन दुसरा नाहीं. तो आपल्या ग्रंथास आर्यभटीय असेंच ह्मणतो. परंतु इतर पुष्कळ ज्योतिष्यांनीं त्यास आर्यसिद्धांत ह्मटलें आहे, व तसें ह्मणणें अगदीं योग्य आहे. दुसरा एक आर्यभट याच्या मागाहून झालेला आहे; आणि त्याचा एक आर्यसिद्धांत आहे. ह्मणून या आर्यभटास प्रथमार्यभट आणि याच्या सिद्धांतास प्रथमार्यसिद्धांत ह्मणणें हें सोईचें आहे. ह्मणून मीं तसें ह्मटलें* आहे.

काल.

या सिद्धांताचे मुख्य दोन भाग आहेत. पहिल्यांत १० पद्यें गीतीछंदाचीं आहेत. इतर सिद्धांतांत मध्यमाधिकारांत असणाऱ्या बहुतेक सर्व गोष्टी ह्मणजे इष्टकालांत अहर्गणमेलया इत्यादि मानें त्या १० गीतींत सांगितलीं आहेत. ह्या भागास दशगीतिक ह्मणतात.

दुसऱ्या भागांत तीन प्रकरणें आहेत. त्यांत इतर सिद्धांतांतल्या इतर गोष्टी आहेत. त्यांत १०८ आर्या आहेत. म्हणून त्यास आर्याष्टशत म्हणतात. हे दोन भाग हे निरनिराळे ग्रंथ असें कोणी म्हणतात. याचा एक टीकाकार सूर्ययज्वन् हा या दोहोंस दोन प्रबंध म्हणतो. या दोहोंपैकीं प्रत्येकाच्या आरंभीं निरनिराळें मंगल केलेलें आहे, यामुळें हे दोन निरनिराळे ग्रंथ कोणी मानले असावे. परंतु ते दोन्ही परस्परांवर अवलंबून आहेत. एकावांचून दुसऱ्याचा कांहीं उपयोग नाहीं म्हटलें तरी चालेल. म्हणून दोहोंमिळून एकच सिद्धांत मानावा हें युक्त होय. स्वतः आर्यभटाचाही तसाच उद्देश दिसतो. पहिल्या भागास त्यानें निराळें कांहीं नांव दिलें नाहीं. व त्याच्या शेवटीं उपसंहार केला नाहीं. एकंदर ग्रंथाच्या शेवटीं मात्र उपसंहार केला आहे, आणि तेथें मात्र "आर्यभटीय" हें नांव दिलें आहे. तसेंच एकंदर ग्रंथांत चार प्रकरणें आहेत. त्या प्रत्येकास स्वतः ग्रंथकार पाद म्हणत नाहीं, तरी पाद म्हणण्याची इतरांची रूढि आहे. दशगीतिक निराळा ग्रंथ मानला तर एकांत एकच आणि दुसऱ्यांत तीन पाद राहतील; त्यांस पाद ( चतुर्थांश ) म्हणणें शोभणार नाहीं. तेव्हां एकंदरींत विचार करितां दशगीतिक आणि आर्याष्टशत मिळून एकच सिद्धांत मानणें योग्य होय. दशगीतिकामध्यें १० पद्यांशिवाय आणखी दोन गीती जास्त आहेत. एकांत मंगल आहे आणि दुसऱ्यांत संख्यापरिभाषा आहे. ह्मणजे एकंदर ग्रंथांत १२० पद्यें आहेत. आर्याष्टशत हा शब्द भ्रामक आहे. यावरून त्यांत ८०० आर्या असाव्या अशी कांहीं युरोपिअन विद्वानांची समजूत झाली होती असें दिसतें. सांप्रत डा. कर्न यानें हालंडदेशांत लेडेन एथें सन १८७४ सालीं हा आर्यसिद्धांत परमादीश्वरकृत भटदीपिकाटीकेसहित छापला आहे. त्यापूर्वी युरोपिअन विद्वानांस याची फारशी माहिती नव्हती.

---

* प्रथम किंवा द्वितीय या विशेषणावांचूनच जर पुढें कोठें उल्लेख आला तर तो याविषयींच समजावा.

बुध खेरीज करून बाकी भगण मूलसूर्यसिद्धांतांतले घेतले. गुरु आणि बुध यांचे भगण यानें स्वतःच्या अनुभवावरून दृक्प्रत्ययास मिळतील असे घेतले असावे असें दिसतें.

युगपद्धति. आर्यभटाची युगपद्धति इतर सिद्धांतांहून किंचित् भिन्न आहे असें वर सांगितलें. ती पद्धति अशी आहेः दशगीतिकांत तो ह्मणतोः

> काहो मनवो ढ १४ मनुयुगश्ख ७२ गतास्तेत्र ६ मनुयुगछ्ना २७ च ॥
> कल्पादेर्युगपादा ग ३ च गुरुदिवसाच्च भारतात् पूर्वं ॥ ३ ॥

यांत एका मनूचीं युगें ७२ आहेत. इतरांप्रमाणें ७१ नाहींत. प्रत्येक मन्वंतरारंभीं संधि सांगितला नाहीं. *भारतगुरुदिवसापूर्वी कल्पादीपासून अमुक काल गेला असें यांत सांगितलें आहे. यावरून व (पृ. १९२) वर दिलेल्या २ ऱ्या आर्येवरून कलियुगारंभ शुक्रवारीं झाला, त्याच्या पूर्वदिवशीं गुरुवार होता असें आर्यभटाचें मत दिसून येतें. परंतु महायुगारंभ† बुधवारीं सूर्योदयीं झाला असें वरील दुसऱ्या आर्येंत आहे. यावरून कलियुगाच्या दुप्पट द्वापर, इत्यादि परिभाषा तो मानीत नाहीं. तसें मानलें तर युगारंभ बुधवारीं धरून कलियुगारंभ शुक्रवारीं येत नाहीं. सर्व युगपाद सारखे मानून तें जमतें. यावरून कृतादि युगपाद तो सारखे मानतो असें निघतें. आणि यावरून पाहतां कल्पारंभापासून वर्तमानकलियुगारंभापर्यंत आर्यभटाच्या मताप्रमाणें १९८६१२०००० इतकीं वर्षे गत होतात, आणि कल्पारंभ गुरुवारीं येतो. इतर सर्व सिद्धांतांप्रमाणें कल्पारंभापासून वर्तमानकल्यादिपर्यंत गतवर्षे १९७२९४४००० ‡येतात; आणि कल्पारंभीं, किंवा सृष्ट्युत्पत्तीस कांहीं वर्षे लागलीं असें कोणी मानतात, त्यांच्या मतें ग्रहप्रचारारंभीं, रविवार येतो. हा जो इतरांशीं आर्यभटाचा भेद आहे त्याबद्दल ब्रह्मगुप्तानें त्यास दूषणें दिलीं आहेत.§

> न समा युगमनुकल्पाः कल्पादिगतं कृतादियातं च ॥ स्मृत्युक्तैरार्यभटो नातो जानाति मध्यगतिं॥१०॥
>
> ब्रह्मगु. सि. अ. ११.

यांत आर्यभटाचें युग, मनु आणि कल्प स्मृतींत सांगितल्याप्रमाणें नाहीं असेंही ब्रह्मगुप्तानें म्हटलें आहे. महायुग त्याचें आणि इतरांचें सारखेंच आहे. वरील भगणसंख्या पाहिल्या असतां दिसून येतें कीं सर्व ग्रहांच्या भगणसंख्या चोहोंनीं विभाज्य आहेत. आणि सर्व ग्रह महायुगारंभीं एकत्र होते असें वरील २ ऱ्या आर्येंत आहे. तसेंच आर्यभटाच्या मतें सर्व युगपाद सारखे आहेत. तसेंच कल्पादिपासून वर्तमानकृतादिपर्यंत महायुगसंख्या त्याच्या मतें पूर्ण गेलेली आहे. यामुळें त्याच्या मताप्रमाणें कल्पारंभीं, प्रत्येक महायुगारंभीं, आणि युगपादारंभीं सर्व ग्रह एकत्र येतात. इतर ग्रहांचीं मंदोच्चें आणि पात यांचे कल्पभगण त्यानें दिलेच नाहींत. सृष्ट्युत्पत्तीस कांहीं वर्षे लागलीं कीं काय याचा विचार करावयाचें त्यास कारणच पडलें नाहीं; परंतु त्याच्या मताप्रमाणें कल्पारंभींच सर्व ग्रह एकत्र येतात. यामुळें त्यानें

---

* भारत ह्मणजे भारती युद्ध. एथे तो शब्द कलियुगारंभ या अर्थी आहे.

† महायुगारंभ असें स्पष्ट नाहीं. तरी पूर्वापर संदर्भ व उपपत्ति यांवरून तसेंच निघतें.

‡ सृष्ट्युत्पत्तीस कांहीं वर्षे गेलीं असें मानितात तीं वर्षे धरून.

§ वरील बहुतेक गोष्टी ब्रह्मगुप्तानें सांगितल्या आहेत. परंतु मीं केवळ त्यावर भरंवसा न ठेवितां स्वतः त्या काढून पाहिल्या आहेत.

[illegible] ॥

यांत कु म्हणजे पृथ्वी इचे परिवर्त* महायुगामध्यें १५८२२३७५०० आहेत. ते असे निघतात:

| यांत ङु या ठिकाणीं डा० केर्नच्या पुस्तकांत पु असें अक्षर पडलें आहे. पु= ८०००००० होतात. म्हणजे ५७०००० जास्त संख्या होते. ङुबद्दल पु अक्षर पडल्यानें इतकी चुकी आली. | | |
|---|---|---|
| | ङि. = | ५०० |
| | शि = | ७००० |
| | ङु = | २३०००० |
| | ण्लृ = | १५०००००००० |
| | ख्टृ = | ८२०००००० |
| | | १५८२२३७५०० |

छापी पुस्तक अतिलक्षपूर्वक शोधून छापलेलें, त्यांत ही चूक.† मग लेखी पुस्तकांत चुका होण्याचा व त्या परंपरेनें वाढत जाण्याचा कसा संभव आहे हें लेखी पुस्तकें पहाण्याचा ज्याला वराच प्रसंग आहे त्यास समजेल. परंपरागत चालत आलेलें व्याख्यान, इतर ग्रंथांशीं मेळ, इत्यादि साधनें नसतील तर हा ग्रंथ कालांतरानें अगदीं निरुपयोगी व्हावयाचा.

यांत ग्रहभगणादि मानें ज्यांत आहेत त्या दोन आर्या प्रथम देऊन त्यावरून त्या संख्या देतों. पहिल्या आर्येचें पूर्वार्ध वर दिलेंच आहे. बाकी आर्या अशाः—

ग्रहगतिभगण.

शनिदुङ्विघ गुर्खिच्युभ कुजभद्लिझनुख भृगुबुध सौराः ॥ १ ॥

चंद्रोच्चनुञ्खिध बुधसुगुशिथृन भृगुजषबिखृ शेषार्काः ॥

बुफिनच पातविलोमा बुधान्ह्यजार्कोदयाच्च लंकायां ॥ ३ ॥

यावरून महायुगांत भगणसंख्या निघतात त्याः—

| | | | |
|---|---|---|---|
| भूभ्रम | १५८२२३७५०० | गुरुभगण | ३६४२२४ |
| रविभगण | ४३२०००० | शुक्रभगण | ७०२२३८८ |
| सावनदिवस | १५७७९१७५०० | शनिभगण | १४६५६४ |
| चंद्रभगण | ५७७५३३३६ | सौरमास | ५१८४०००० |
| चंद्रोच्चभगण | ४८८२१९ | अधिमास | १५९३३३६ |
| चंद्रपातभगण | २३२२२६ | चांद्रमास | ५३४३३३३६ |
| मंगळभगण | २२९६८२४ | तिथि | १६०३०००८० |
| बुधभगण | १७९३७०२० | क्षयाह | २५०८२५८० |

वर्षमान दि. ३६५ घ. १५ प. ३१ विप. १५.

मूलसूर्यसिद्धांतांतील भगणसंख्या पूर्वी दिल्या आहेत (पृ. १६६), त्यांत राहुभगण नाहींत. परंतु बाकी संख्या आणि या आर्यसिद्धांताच्या भगणसंख्या यांची तुलना करून पाहिली असतां दिसतें कीं गुरु आणि बुध यांचे भगण मात्र दोहोंचे भिन्न आहेत; बाकी सर्व सारखे आहेत. आणि मूलसूर्यसिद्धांत आर्यभटाच्या पूर्वीचा असें पूर्वी दाखविलेंच आहे. यावरून आर्यभटानें गुरु आणि

---

* पृथ्वीला दैनंदिन गति आहे असें आर्यभट मानतो म्हणून त्यानें भूभ्रमसंख्या दिली आहे. इतर सिद्धांतांत याबद्दल नक्षत्रभ्रम दिलेले असतात.

† टीकेवरून ही चुकी समजून येत नाहीं. परंतु उपपत्ति, इतर ग्रंथांशीं मेळ, इत्यादि विचार करितां ही चुकी सहज समजते. तथापि डा० केर्नची ही चुकी बऱ्याच विद्वानांस भ्रमांत पाडील.

तीय आर्यसिद्धांत यांत मात्र शुद्धगणितही आहे. भास्कराचार्याचें सिद्धांताचें लक्षण वर दिलें आहे (पृष्ठ ७), त्यांत द्विधागणित ह्मणजे व्यक्त (अंकगणित) आणि अव्यक्त (बीजगणित) यांचा समावेश त्यानें सिद्धांतांत केला आहे. व त्याप्रमाणें लीलावती आणि बीजगणित हे जे त्याचे दोन ग्रंथ ते सिद्धांतशिरोमणीचेच भाग असें तो ह्मणतो. तरी ते स्वतंत्र ग्रंथ अशासारखे त्यानें रचले आहेत. आणि त्यांतील कांहीं उल्लेखांवरून दिसून येतें कीं भास्कराचार्याच्या पूर्वीच केवळ बीजगणितावर स्वतंत्र ग्रंथ झाले होते. दोन्ही आर्यभट आणि ब्रह्मगुप्त यांनीं सिद्धांतांतच बीजादि गणिताचा संग्रह केला आहे, तरी ते विषय निराळ्याच अध्यायांत दिले आहेत.

आर्यभटाच्या गणितपादांतील विषय थोडक्यांत सांगतों. पहिली मंगलाची आर्या सोडून या पादाच्या ३२ आर्या आहेत. त्यांत दशगुणोत्तर संख्यांच्या संज्ञा, वर्ग, घन, वर्गमूळ, घनमूळ; त्रिभुज, वृत्त, आणि इतर क्षेत्रें, यांचें क्षेत्रफळ; घन, गोल, यांचें घनफळ; भुजज्यासाधन आणि त्यांविषयीं कांहीं विचार; श्रेढी, त्रैराशिक, भिन्नकर्म (अपूर्णांक), त्रैराशिकानें किंवा बीजगणितानें होणाऱ्या एकदोन चमत्कारिक उदाहरणांचे प्रकार, आणि कुट्टक ह्मणून गणिताचा प्रकार आहे तो; इतके विषय गणितपादांत आहेत. टालमी आणि त्याचे पूर्वींचे ग्रीक ज्योतिषी यांस भुजज्या ( Sines ) माहीत नव्हत्या. ते ज्यां ( chords ) चा उपयोग करीत असत. आमच्या ज्योतिषाची माहिती युरोपियनांस होण्यापूर्वी त्यांची अशी समजूत होती कीं ज्या टाकून देऊन भुजज्या (ज्यार्धे) यांचा उपयोग प्रथम केला असा इ. स. च्या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत झालेला आरब ज्योतिषी अलबटानी यानें.* परंतु या आर्यभटाच्या ग्रंथावरून दिसून येतें कीं शके ४२१ मध्यें आह्मांस अर्धज्या माहीत होत्या. सांप्रतच्या सूर्यसिद्धांतांतही अर्धज्या आहेत. आणखी एक गोष्ट विशेषतः सांगण्यासारखी आहे कीं वृत्ताचा व्यास आणि परिधि यांचें गुणोत्तर आर्यभटानें फार सूक्ष्म दिलें आहे तें असें :— .

चतुरधिकं शतमष्टगुणं द्वाषष्टिस्तथा सहस्राणां ॥ अयुतद्वयविष्कंभस्यासन्नो वृत्तपरिणाहः ॥ १० ॥

गणितपाद.

यांत २००० व्यासाच्या वर्तुलाचा परिधि ६२८३२ सांगितला आहे. म्हणजे १: ३.१४१६ हें गुणोत्तर झालें. हें तरी आसन्न (जवळ जवळ) असेंच ह्मटलें आहे.

पृथ्वीची दैनंदिनगति.

पृथ्वी प्रत्यहीं आपल्याभोवतीं फिरते, ह्मणजे तिला दैनंदिन गति आहे, असें मानणारा ज्योतिषी आमच्या देशांत एक हा आर्यभट मात्र होय. तो म्हणतोः–

अनुलोमगतिर्नौस्थः पश्यत्यचलं विलोमगं यद्वत् ॥ अचलानि भानि तद्वत् समपश्चिमगानि लंकायां ॥

गोलपाद.

भटप्रकाशिकाटीकाकारानें "भानि कर्तृभूतानि अचलानि भूमिगतानि वस्तूनि कर्मभूतानि विलोमगानीव प्राचीं दिशं गच्छंतीव पश्यंति." अशाप्रकारें पृथ्वी अचल असेंच आर्यभटाचें मत असें प्रतिपादण्याचा यत्न केला आहे. परंतु आर्यभटानें

* बर्जेसचें सू. सि. भाषांतर १० ५६ पहा.

युगारंभास कांहीं वर्षे लागलीं असें मानलें नाहीं, असेंच सिद्ध होतें. सर्व ग्रहांचीं उच्चें आणि पात यांचे भगण त्यानें दिले असते तर कल्पारंभ तोच ग्रहप्रचारारंभ या गोष्टीस अनुमोदनच तें दिलें असतें.

आर्यभटानें आपला काल असा दिला आहे:—

आर्या. षष्ट्यब्दानां षष्टिर्यदा व्यतीतास्त्रयश्च युगपादाः॥ त्र्यधिका विंशतिरब्दास्तदेह मम जन्मनोऽतीताः॥

कालक्रियापाद.

यावरून तीन युगपाद गेल्यावर ३६०० वर्षे गेलीं तेव्हां ह्मणजे गतकलि ३६०० या वर्षी, म्हणजे शके ४२१ या वर्षी त्याच्या वयाचीं २३ वर्षे गेलीं होतीं. यावरून त्याचा जन्म शके ३९८ या वर्षी झाला असें सिद्ध होतें.

वर्षमान.

पंचसिद्धांतिकोक्त सूर्यसिद्धांताचें वर्ष ३६५।१५।३१।३० इतकें आहे. आणि आर्यभटसिद्धांतांतील मानें वर दिलीं आहेत त्यावरून त्यांतील वर्षमान ३६५।१५।३१।१५ आहे. म्हणजे १५ विपळें कमी आहे. परंतु मूळ (पंचसिद्धांतिकोक्त) सूर्यसिद्धांतांत कलियुगारंभ गुरुवार मध्यरात्रीं आहे. आणि आर्यभटानें तो शुक्रवारसूर्योदयीं मानिला आहे, म्हणजे १५ घटिका मागाहून मानिला आहे. परंतु याचें वर्षमान १५ विपळें कमी असल्यामुळें ३६०० वर्षांत बरोबर १५ घटिका कमी होतात. आणि त्यामुळें गतकलि ३६०० (शके ४२१) या वर्षी मूळसूर्यसिद्धांत आणि आर्यसिद्धांत यांप्रमाणें सूर्याचें मध्यमेषसंक्रमण म्हणजे वर्षारंभ एक कालींच झाला. आणि यावरून असें दिसून येतें कीं युगारंभ सूर्योदयीं मानल्यामुळें जें अंतर पडेल तें न पडावें म्हणून यानें वर्षाचें मान १५ विपळें कमी मानलें आहे.

याच्या कालाविषयीं कदाचित् कोणास संशय असेल तर वरील वर्षमानावरून याच्या कालाविषयीं संशयच रहात नाहीं. त्याचें जन्म शके ३९८ या वर्षीच होय.

गणितपादाच्या पहिल्या आर्येत आर्यभट म्हणतो कीः—

स्थल. आर्यभटस्त्विह निगदति कुसुमपुरेऽभ्यर्चितं ज्ञानं॥

यावरुन याचें वसतिस्थान कुसुमपूर होय. हें बंगाल्यांतलें पाटणा होय असें समजतात.

विषय.

या आर्यभटाच्या सिद्धांतांत दशगीतिकपादामध्यें ग्रहभगणादि मानें आहेत. पुढें गणित, कालक्रिया, गोल असे तीन पाद आहेत. गणित या पादामध्यें शुद्धगणितापैकीं अंकगणित (पाटीगणित), बीजगणित, भूमिति, त्रिकोणमिति यांतले कांहीं विषय आहेत; आणि बाकी दोन पादांत केवळ ज्योतिषशास्त्रविषयक असेच विषय आहेत. ज्योतिःशास्त्र हा म्हटला ह्मणजे वस्तुतः सांप्रतच्या दृष्टीनें प्रयुक्त गणिताचा विषय होय. तेव्हां त्यांत शुद्ध गणिताच्या संख्यागणित इत्यादि शाखा असण्याचें कारण नाहीं. परंतु ज्योतिषशास्त्रास शुद्ध गणिताचें वारंवार कारण लागणारच. तेव्हां इतक्या प्राचीनकालाच्या ग्रंथांत दोन्ही प्रकार एका ग्रंथांत असणें साहजिक आहे. परंतु असें मिश्रण तरी थोड्याच ग्रंथांत आढळतें. मूळच्या सूर्यादि सिद्धांतांत तें होतें कीं काय हें समजण्यास साधन नाहीं, परंतु पंचसिद्धांतिकेंत तें नाहीं. तसेंच सांप्रतच्या सूर्यसोमादि सिद्धांतांत नाहीं. हा आर्यसिद्धांत, ब्रह्मगुप्तसिद्धांत, आणि द्वि-

इतर सिद्धांत जसे विस्तृत आहेत, सर्व विषय त्यांत असतात तसा हा नाहीं. सांप्रतचा सूर्यसिद्धांत, ब्रह्मगुप्तसिद्धांत, सिद्धांतशिरोमणि, ह्या सिद्धांतांवरून गणित करण्यास करणग्रंथाहून जास्त वेळ लागेल हें खरें, तरी त्यांतला कोणताही एक असला तर दुसरा ग्रंथ नाहीं ह्मणून अडणार नाहीं. तसें याचें नाहीं. उदाहरणार्थ, तिथि, नक्षत्र, करण हीं काढण्याची रीति यांत नाहीं. महापाताचें गणित कांहींच नाहीं. महापात आर्यभटास माहीत नव्हता असें नाहीं, त्याचा उल्लेख आर्यसिद्धांतांत आहे. तसेंच तिथिनक्षत्रादिक त्याच्या वेळीं असलींच पाहिजेत. याप्रमाणेंच इतरही कांहीं गोष्टी आहेत. इतर सिद्धांतांत त्या असतात. यावरून आर्यभटानें एकादा करणग्रंथ केला असावा असें मनांत येतें. दिनप्रवृत्ति सूर्योदयीं हें आर्यभटाचें ह्मणणें दशगीतिकांतील २ री आर्या वर दिली आहे (पृ. १९२) तींत आहे. परंतु लंकार्धरात्रकालीं दिनप्रवृत्ति असेंही तो ह्मणतो असें वराहमिहिर ह्मणतो. (पृ. १६८ पहा) तें आर्यभटाचें ह्मणणें आर्यभटीयांत कोठे आढळत नाहीं. यावद्दल ब्रह्मगुप्तही त्यास दूषण देत नाहीं. यावरून ब्रह्मगुप्ताच्या वेळींही तशी एखादी आर्या आर्यभटीयांत नव्हती असें सिद्ध होतें. 'दशगीतिक' आणि 'आर्याष्टशत' ह्या आर्यसिद्धांताच्या दोन भागांचा उल्लेखही याच शब्दांनीं ब्रह्मगुप्तानें केला आहे. यावरून ब्रह्मगुप्ताच्या पूर्वींपासून जो आर्यभटीयसिद्धांत आहे त्यांत कोणीं कमजास्त केलेलें नाहीं असें दिसून येतें. यावरून आर्यभटाचा दुसरा एकादा ग्रंथ असावा असें वराहमिहिराच्या या लिहिण्यावरून दिसतें. आणि ब्रह्मगुप्ताचें खंडखाद्य व त्यावरील वरुणाची टीका यावरून आर्यभटाचा एखादा करणग्रंथ असावा असें अनुमान होतें. तो सांप्रत उपलब्ध मात्र नाहीं.

आर्यभटकरण.

ब्रह्मगुप्तानें आर्यभटास फारच दूषणें दिलीं आहेत. निरनिराळ्या प्रकारचीं दूषणें सांगून पुढें तो ह्मणतोः—

दोष.

स्वयमेव नाम यत्कृतमार्यभटेन स्फुटं स्वगणितस्य ॥ सिद्धं तदस्फुटत्वं ग्रहणादीनां विसंवदति ॥४२॥
जानात्येकमपि यतो नार्यभटो गणितकालगोलानां ॥ न मया प्रोक्तानि ततः पृथक् पृथक् दूषणान्येषां
॥ ४३ ॥ आर्यभटदूषणानां संख्यावक्तुं न शक्यते... ॥

ब्र. गु. सि. अ. ११.

यांत आर्यभटाच्या ग्रंथावरून ग्रहणादिकांचा विसंवाद ब्रह्मगुप्ताच्या वेळीं होत असे ( दृक्प्रत्यय बरोबर येत नसे ) हें विचार करण्यासारखें आहे. बाकी कांहीं दूषणें वर सांगितलीं आहेत त्यावरून त्यांचें सत्यासत्यत्व दिसून येईल. एकंदरींत पहातां कांहीं दूषणें खरीं आहेत हें खरें, तरी ब्रह्मगुप्ताच्या लिहिण्यांत दुराग्रहाचा भाग फार आहे.

कालांतरेण दोषा येन्यैः प्रोक्ता न ते मयाभिहिताः ॥

असें ब्रह्मगुप्त ह्मणतो. परंतु ब्रह्मगुप्ताच्या पूर्वींच्या उपलब्ध ग्रंथांपैकीं पंचसिद्धांतिकेंत आर्यभटाचें नांव मात्र आढळतें. दूषणें कोठेंच आढळत नाहींत. यावरून ब्रह्मगुप्ताच्या पूर्वींचे कांहीं ग्रंथ लोपले असावे. शक ४२० च्या पूर्वींचे ग्रंथकार वर सांगितले त्यांचें ग्रंथ हल्लीं नाहींत.

ग्रंथलोप.

ज्यानादि मानांत नक्षत्रांविषें न सांगतां भूभ्रम सांगितले आहेत (पृ. १५१ पहा). तसेंच 'प्राणेनैति कलां भूः' म्हणजे प्राणनामक कालपरिमाण ( पळाचा षष्ठांश ) यांत पृथ्वी एक कला फिरते असें तो दुसरे स्थळीं ( दशगीतिक आर्या ४ ) म्हणतो. तसेंच ब्रह्मगुप्तादिकांनीं पृथ्वी फिरते असें आर्यभटाचें जें मत त्यास दूषणें दिलीं आहेत. ब्रह्मगुप्त म्हणतोः

प्राणेनैति कलां भूर्यदि तर्हि कुतो व्रजेत् कमध्वानं ॥ आवर्तनमुर्व्याश्चेन्न पतंति समुच्छ्रयाः कस्मात्॥

ब्र. सि. अ. ११.

भटप्रकाशिकाकारानें प्राणेनैतिकलांभूः या आर्यभटोक्त आर्येत 'भूः' याबद्दल भं ( भमंडलं ) असा पाठ घेऊन टीका केली आहे. "अनुलोम" या पुढील आर्यभटाची आर्या अशी आहेः—

उदयास्तमयनिमित्तं नित्यं प्रवहेण वायुना क्षिप्तः ॥ लंकासमपश्चिमगो भपंचरः सग्रहो भ्रमति ॥१०॥

गोलपाद.

तथापि एकंदर विचार पाहतां पृथ्वी फिरते असेंच आर्यभटाचें मत होतें असें दिसून येतें. तो तिची दैनंदिनगति मात्र मानतो*. ती सूर्याभोंवतीं फिरते असें त्याचें मत होतें असें दिसत नाहीं.

या आर्यभटसिद्धांतांत इतर ग्रंथांतल्याप्रमाणें अधिकार नाहींत, परंतु त्यांतले बहुतेक विषय आहेत. मात्र चंद्रशृंगोन्नति आणि भग्रहयुति ह्या अधिकारांतले विषय यांत नाहींत. चंद्रशृंगोन्नतिछायादिज्ञान आर्यभटीयावरून होणार नाहीं, असा ब्रह्मगुप्तानें त्यास दोष दिला आहे. योगतारांचे भोग आणि शर इतर सिद्धांतांत असतात, ते यांत नाहींत. हेंही एक मोठें न्यून ह्यांत आहे. ते असते तर आर्यभटाचा काल निःसंशयपणें माहीत असल्यामुळें त्यांचा ज्योतिःशास्त्रेतिहासास फार उपयोग झाला असता. त्याच्या पूर्वीं किंवा त्याच्या वेळीं हा विषय अगदीं अज्ञात होता असें नाहीं. पंचसिद्धांतिकेंत नक्षत्रयोगतारांच्या शरभोगाविषयीं कांहीं सांगितलें आहे. अयनगति हा जो फार महत्वाचा विषय त्यासंबंधेंही या सिद्धांतांत कांहीं नाहीं.

हा आर्यसिद्धांत फार संक्षिप्त आहे, तथापि यांत जे विषय आहेत ते चांगले स्पष्ट समजतील असे लिहिले आहेत. संक्षेपामुळें अतिदुर्बोधता आली आहे असें नाहीं. असें आहे तथापि त्याच्या एकंदर स्वरूपावरून असें दिसून येतें कीं ज्योतिष्यांच्या नित्य व्यवहारास उपयोगी पडावा अशा हेतूनें तो केलेला नाहीं. तर सिद्धांतभूत महत्वाचे विषय सांगण्याच्या हेतूनेंच केवळ तो केलेला दिसतो. नित्य उपयोगास सिद्धांतग्रंथ उपयोगी नाहीं, करणग्रंथ पाहिजे, हें खरें; तरी

---

* Grant's History of Physical Astronomy ( पृ. २ ) यांत असें म्हटलें आहेः—

" साराक्यूज येथील निसिटस ( Nicetas of Syracuse ) याचें मत पृथ्वी आंसाभोंवतीं मात्र फिरते असें होतें असें म्हणतात. ग्रीस देशांतील तत्त्वज्ञानी पिथ्यागोरास ( Pythagoras इ. स. पू. ६ वें शतक ) याचें मत सूर्य हा विश्वाचा मध्य आहे, आणि पृथ्वी त्या भोंवतीं फिरते, असें होतें असें म्हणतात. परंतु वेधादिकांवरून हीं मतें झालेलीं होतीं आणि त्याप्रमाणें ग्रहस्थितीचें गणित करण्याच्या कांहीं रीति त्यांनीं स्थापिल्या होत्या असें वाटत नाहीं. कदाचित् ह्या तुसत्या कल्पनाच असतील."

साधलें आहेत. चांगल्यावाईट ज्ञानाच्या समुद्रांतून दैवतप्रसादानें, किंवा स्वबुद्धीनेंच त्यांत बुडी मारून, सत्यज्ञानरूपी रत्न ऱ्यां काढलें.

ग्रहणें, युति, इत्यादिकांवरून मध्यगतिही काढतां येईल, परंतु त्यांवरून मुख्यतः स्पष्टग्रहस्थिति समजतें. यावरून आणि पूर्वी लिहिलेल्या इतर आधारांवरून असें दिसून येतें कीं ग्रहस्पष्टीकरणांत आर्यभटानें सुधारणा केली; तसेंच पूर्वींच्या ग्रंथांचा सारासार विचारानें, स्वबुद्धीनें आणि वेधानें त्यानें नवीन शोध केले. यावरूनही त्याची मोठी योग्यता दिसून येते.

प्रसार. अनुयायी.

बृहत्संहिताटीकेंत उत्पलानें आर्यभटीयांतील पुष्कळ आर्यांचें अवतरण केलें आहे. आणि त्यानंतरच्या बऱ्याच ग्रंथांत त्याचीं वचनें आढळतात. लल्ल नामक जो प्रख्यात ज्योतिषी झाला तो आर्यभटाचा अनुयायी आहे. त्यानें आर्यभटोक्त ग्रहगतींस बीजसंस्कार दिला आहे. करणप्रकाशनामक जो शके १०१४ मध्यें झालेला आर्यपक्षाचा करणग्रंथ तो आर्यभटोक्त भगणांवरून येणाऱ्या ग्रहगतिस्थितीस लल्लोक्तबीजसंस्कार देऊन केलेला आहे. ( हें पुढें सविस्तर दाखविण्यांत येईल. ) तसेंच भटतुल्यनामक जो दामोदराचा करणग्रंथ शके १३३९ मध्यें झालेला आहे तोही याप्रमाणेंच आहे. करणप्रकाशग्रंथावरून अद्यापिही कोणी गणित करितात. आणि त्याचे अभिमानी तर पुष्कळच आहेत. ग्रहलाघवांत गुरु, मंगळ, राहु हे ग्रह करणप्रकाशावरून घेतले आहेत. आणि ग्रहलाघव तर हिंदुस्थानच्या तृतीयांशाहून जास्त भागांत चालतो. यावरून आर्यसिद्धांत मूलरूपानें नाहीं तरी बीजसंस्कृतरूपानें अद्याप चालत आहे. शके १४०० पासून पुढें महाराष्ट्रांत आणि काशी एथे जे ज्योतिषाचे ग्रंथ झाले त्यांत या आर्यसिद्धांतांतील वचनें आढळत नाहींत. सांप्रत या प्रांतांत आर्यसिद्धांत मूलरूपानें बहुधा प्रसिद्ध नाहीं असें वर लिहिलेंच आहे. डा॰ केर्न यानें आर्यभटीय पुस्तक, त्यास मिळालेल्या तीन प्रतींच्या आधारें छापलें आहे, त्या तिन्ही प्रती मलयलम लिपींतल्या आहेत. यावरून अगदीं दक्षिण हिंदुस्थानांत त्यांत विशेषतः मलबार प्रांतांत अद्याप आर्यसिद्धांत प्रसिद्ध आहे असें दिसतें. तिकडे तामिळ आणि मल्याळी भाषा ज्या प्रांतांत चालते त्यांत सौरमानाचें पंचांग चालतें. तें आर्यपक्षाचें आहे. म्हणजे त्यांतलें वर्ष प्रथमार्यसिद्धांताचें आहे. वैष्णवलोक आर्यपक्षाचे अभिमानी आहेत. त्यांची विशेष वस्ती कर्नाटक, म्हैसूर या प्रांतांत आहे. बंगाल्यांतील पाटणा हें आर्यभटाचें स्थान समजतात. परंतु मला त्याविषयीं

स्थान.

संशय वाटतो. कारण बंगाल्यांत आर्यसिद्धांत मुळींच चालत नाहीं. यावरून आर्यभटाचें कुसुमपुर हें कदाचित् दक्षिणेंत असेल; परंतु याविषयीं निश्चयानें कांहीं सांगतां येत नाहीं.

ग्रहशुद्धि.

आर्यसिद्धांतांतील ग्रह युरोपियन कोष्टकांवरून निघणाऱ्या ग्रहांशीं ताडून पाहिले असतां कधीं बिनचूक येतात हें वर दिलेंच आहे. (पृ. १७५ ). परंतु त्याहून स्पष्टपणें समजण्याकरितां व विचार करितां येण्याकरितां आर्यभटीयकालचे ह्मणजे शके ४२१ (इ. स. ४९९) मध्यम मेषसंक्रमण वेळेच्या सुमाराचे आर्यभटीयावरून काढलेले मध्यम ग्रह आणि युरोपियन कोष्टकांवरून काढलेले मध्यम ग्रह पुढें २०० व्या पृष्ठांत एकत्र दिले आहेत.

ज्योतिषसिद्धांतकाराची योग्यता पाहण्याचें एक मुख्य साधन म्हटलें ह्मणजे त्याच्या ग्रंथावरून येणारा दृक्प्रत्यय हें होय. आणि यासंबंधें पाहिलें असतां आर्यभटाची योग्यता मोठी आहे. गुरु आणि बुध यांचीं भगणमानें यानें स्वतः पूर्वीच्याहून निराळीं काढलीं हें वर लिहिलें आहे. तथापि ग्रहस्पष्टीकरणासंबंधें पूर्वग्रंथांत त्यानें सुधारणा केली असें दिसतें. श्रीषेण आणि विष्णुचंद्र यांनीं आर्यभटाच्या ग्रंथांतून स्पष्टीकरण, मंदोच्चें, पात आणि परिधि घेतले असें ब्रह्मगुप्त ह्मणतो. या दोघांच्या पूर्वी मूलसूर्यसिद्धांतादि पंचसिद्धांत होते, लाटादिकांचे ग्रंथ होते, आणि आर्यभटाचा होता. परंतु यांपैकीं आर्यभटाच्या ग्रंथांतूनच स्पष्टीकरण घेतलें यावरूनच त्याच्या वेळीं इतरांपेक्षां दृक्प्रत्ययासंबंधें त्याची जास्त योग्यता होती असें सहज दिसतें. ग्रहस्पष्टीकरणाचें जें एक मुख्य अंग मंदशीघ्रवृत्ताचे परिध्यंश ते पंचसिद्धांतिकेहून आर्यभटाचे भिन्न आहेत असें पुढें स्पष्टाधिकारांत सर्वांचे परिध्यंश दिले आहेत त्यांवरून दिसून येईल. त्यावरून ग्रहस्पष्टीकरणाच्या कामीं त्यानें शुद्धता केली असें स्पष्ट दिसतें. छिद्रान्वेषणपटु जो ब्रह्मगुप्त त्यानें आर्यभटाच्या दूषणांची संख्या करवत नाहीं असें ह्मटलें असतांही खंडखाद्याच्या पहिल्या आर्येंत तो म्हणतो कीं,

वक्ष्यामि खंडखाद्यकमाचार्यार्यभटतुल्यफलं ॥

स्वतःच्या सिद्धांताचा अत्यंताभिमान सोडून ज्याच्याशीं याची अत्यंत प्रतिस्पर्धा त्याच्या ग्रंथाशीं तुल्य* असा ग्रंथ करितों असें ब्रह्मगुप्तास ह्मणावें लागलें. यावरून आर्यभटाची योग्यता स्पष्ट दिसून येते. आणि त्याच्या पूर्वीचे मूलसूर्यसिद्धांतादि ग्रंथ असतां त्याच्या ग्रंथाचें प्राधान्य स्थापित झालें यावरून ती योग्यता अधिक वाढते. आणि या गोष्टीस पुढील श्लोकावरून जास्त बळकटी येते.

सिद्धांतपंचकविधावपि दृग्विरुद्धमौढ्योपरागमुखखेचरचारक्लृप्तौ ॥
सूर्यः स्वयं कुसुमपुर्यभवत् कलौ तु भूगोलवित् कुलप आर्यभटाभिधानः ॥

हें वाक्य कोणाचें, कधींचें आहे वगैरे कांहीं माहीत नाहीं. डा॰ केर्न यानें प्रस्तावनेंत हें दिलें आहे. यांत पद्यकार म्हणतो कीं, पंचसिद्धांतपद्धति असतांही ग्रहांचे अस्त, ग्रहणें, इत्यादींविषयीं दृग्विरोध येऊं लागला म्हणून ग्रहांचे चार (गति) कल्पिण्याकरितां सूर्य स्वयें कुसुमपुरांत आर्यभट नांवानें अवतरला. यांत सिद्धांतपंचकाप्रमाणें दृक्प्रत्यय येत नाहीं, असें म्हटलें आहे, यावरून आर्यभटानंतर लवकरच कोणीं हा श्लोक लिहिला आहे असें दिसतें. यावरून आर्यभटाची योग्यता मोठी मानली जात होती आणि त्याच्या कालाच्या मानानें पाहिलें असतां ती मोठी आहे असें स्पष्ट दिसून येतें. स्वतः आर्यभट म्हणतोः

क्षितिरवियोगाद्दिनकृद्रवीन्दुयोगात् प्रसाधितश्चंद्रः ॥ शशितारग्रहयोगात्तथैव ताराग्रहाः सर्वे ॥ ४८ ॥
सदसज्ज्ञानसमुद्रात् समुद्धृतं देवताप्रसादेन ॥ सज्ज्ञानोत्तमरत्नं मया निमग्नं स्वमतिनावा ॥ ४९ ॥

अर्थः—पृथ्वी आणि सूर्य यांच्या योगावरून सूर्य साधला† आहे; रविचंद्रांच्या योगावरून चंद्र साधला आहे. आणि चंद्र, तारा, ग्रह यांच्या योगावरून सर्व ग्रह

---

* ही तुलना बरोबरीची नाहीं. कितपत आहे हें पुढें ब्रह्मगुप्तवर्णनांत दाखविण्यांत येईल.

† पहिलें वाक्य चंद्रग्रहणास आणि दुसरें सूर्यग्रहणास अनुलक्षून आहे.

एकदम सर्वांची तुलना करितां यावी ह्मणून मूलसूर्यसिद्धांत, सांप्रतचा सूर्यसिद्धांत आणि ब्रह्मगुप्तसिद्धांत यांवरूनही त्या वेळचेच ग्रह काढून ते तेथेच दिले आहेत.

शकगतवर्ष ४२१ मध्यम मेषसंक्रमणवेळा.

| | घटी | पळें | |
|---|---|---|---|
| मूलसूर्यसिद्धांत | १५ | ० | अमान्त चैत्र कृ० ९ रविवार |
| प्रथमार्यसिद्धांत | १५ | ० | (ता० २१ मार्च) उज्जयिनी |
| सांप्रतचे ( वर्तमान ) सूर्यादि पांच सिद्धांत | १६ | २४ | मध्यमोदयापासून गत. |
| ब्रह्मगुप्तसिद्धांत, चैत्र कृ० ८ शनिवार | २२ | ३० | |

वरील २०० व्या पृष्ठांतलि ११ व्या कोष्टकांत केरोपंती ग्रहसाधनकोष्टकावरून काढलेले ग्रह आहेत. ह्मणजे ते युरोपियन ग्रंथांवरून काढलेले सूक्ष्म आहेत. ते सायन आहेत. त्यांत चंद्र, चंद्रोच्च आणि राहु यांस मात्र कालांतरसंस्कार दिला आहे. याच कोष्टकांतलि ग्रहांस अयनांशसंस्कार शके ४२१ या वर्षी धन १६ कला ५४ विकला मानून तो देऊन आलेले निरयन ग्रह १२ व्या कोष्टकांत आहेत. आणि यांशींच मूलसूर्यसिद्धांतादिकांच्या ग्रहांची तुलना केली आहे. १६।५४ अयनगति सुमारें २० वर्षांत होते. ह्मणजे ४२१ मध्यें इतके अयनांश मानल्यानें शके ४४१ मध्यें अयनांश शून्य मानल्यासारखें झालें. हें वर्ष श. ४४४ च्या जवळच आहे. शके ४९६ च्या सुमारें रेवतीयोगतारा संपातीं होती हें खरें. व त्याप्रमाणें त्या वर्षी अयनांश शून्य मानावें असें ह्मणतात. परंतु भारतीयांनीं श. ४४५ च्या सुमारें शून्य मानलें तेंच त्यांच्या पद्धतीस अनुसरून बरोबर आहे असें पुढें अयनचलनविचारांत दाखविलें आहे. वरील तुलनेंत १६।५४ मानण्याचें कारण येवढेंच कीं, तसें केल्यानें निरयन रविभोग शून्य येऊन रवीसंबंधें तुलना करण्यास सोपें पडावें. यांत फार चूक पडेल असें नाहीं; फार तर ४ कलांची पडेल.

तुलना करितांना सर्वत्र विकला सोडल्या असतां कांहीं हरकत नाहीं. कारण या तुलनेंत त्यांची किंमत नाहीं ह्मटलें तरी चालेल. कोष्टक १ आणि ३ यांतील रविभोग शून्य आहे, ह्मणून त्यांतील ग्रहांची १२ व्या कोष्टकांतील ग्रहांशीं तुलना २ च्या व ४ थ्या कोष्टकांत केली आहे, ती स्वतः ग्रहासंबंधें आहे व सूर्यसंबंधेंही आहे. ह्मणजे प्रत्येक ग्रह स्वतंत्रपणें १२ व्या कोष्टकांतील ग्रहाशीं तोलून पाहिला असतां जें अंतर येतें तें २ च्या व ४ थ्या कोष्टकांत आहे. तसेंच १२ व्या कोष्टकांतील प्रत्येक ग्रह त्यांतील सूर्याच्या पुढें जितका आहे आणि १, ३ कोष्टकांतील ग्रह त्यांतील सूर्याच्या पुढें जितका आहे त्या दोन अंकांची तुलना केली असतां जें अंतर येतें तेंही २, ४ कोष्टकांतील अंक दाखवितात. ५ वें आणि ८ वें यांतील रविभोग शून्य नाहीं. ह्मणून त्यांतील ग्रहांची स्वतंत्रपणें १२ व्या कोष्टकांतील ग्रहांशीं तुलना करून आलेलें अंतर ६ व्या व ९ व्या कोष्टकांत दिलें आहे; आणि सूर्यसंबंधें तुलना करून आलेलें अंतर ७ व्या व १० व्या कोष्टकांत दिलें आहे.

मूलसूर्यसिद्धांताच्या ग्रहांत बुध आणि गुरु यांचें मात्र अंतर एक अंशाहून जास्त आहे; बाकीच्यांचें त्याहून कमी आहे. प्रथमार्यसिद्धांतांतील बुधाचें मात्र अंतर २ अंशांहून जास्त आहे, बाकी कोणत्याचेंही ५१ कलांहून जास्त नाहीं. वर्तमान सूर्यसिद्धांतांतील ग्रहांचें अंतर चंद्रखेरीज करून बहुतेकांचें बरेंच आहे. ब्रह्मगुप्त-

शके ४२१ चैत्र शु० १ रविवार सूर्योदयापासून घ० १५ या वेळचे मध्यमभोग.

| ग्रहादि. | मूळ सूर्यसिद्धांत. | | | | १२ व्या कोष्टकांतील ग्रहांहून ± | | | प्रथमार्यभटसिद्धांत. | | | | १२ व्या कोष्टकांतील ग्रहांहून ± | | | सांप्रतच्या सूर्य[illegible] सिद्धांत. | | | | १२ व्या कोष्टकांतील ग्रहांहून जास्त कमी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १ | | | | २ | | | ३ | | | | ४ | | | ५ | | | | ६ | | |
| | रा. | अं. | क. | वि. | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि. | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि. | अं. | क. | वि. |
| रवि | ० | | | | ० | | | ० | | | | ० | | | ११ | २९ | ५८ | ३७ | −० | १ | २३ |
| चंद्र | ९ | १० | ४८ | ० | −० | ४ | ४८ | ९ | १० | ४८ | ० | −० | ४ | ४८ | ९ | १० | २१ | ३३ | −० | २३ | १९ |
| चंद्रोच्च. | १ | ५ | ४२ | ० | −० | २८ | ३० | १ | ५ | ४२ | ० | −० | २८ | ३० | १ | ० | ५३ | ५१ | −४ | १६ | ३१ |
| राहु. | | | | | | | | ११ | २२ | १२ | ० | −० | ४२ | १८ | ११ | १८ | ३६ | ४ | −४ | १८ | १४ |
| मंगळ | ० | ७ | १२ | ० | +० | ७ | ० | ० | ७ | १२ | ० | +० | ७ | ० | ० | ९ | २३ | १६ | +२ | १८ | १६ |
| बुध. | ६ | ० | ० | ० | −३ | २२ | १२ | ६ | ६ | ० | ० | −२ | ३७ | ४८ | ६ | १७ | ५४ | १६ | +१४ | ३२ | ४ |
| गुरु. | ६ | ६ | ० | ० | −१ | २१ | ५४ | ६ | ७ | १२ | ० | −० | १७ | ५४ | ६ | ५ | ५१ | ५३ | −१ | ३० | १ |
| शुक्र. | ११ | २६ | २४ | ० | +० | ६ | २४ | ११ | २६ | २४ | ० | +० | ६ | २४ | ११ | २२ | ४५ | ४५ | −३ | ३१ | ५१ |
| शनि. | १ | १९ | १२ | ० | +० | ५१ | ५४ | १ | १९ | १२ | ० | +० | ५१ | ५४ | १ | २० | २३ | ५७ | +२ | ३ | ५१ |

| ग्रहादि. | सूर्यसंबंधानें १२ व्यांतल्याहून जास्त कमी. | | | ब्रह्मगुप्तसिद्धांत. | | | | १२ व्या कोष्टकांतल्याहून जास्त कमी. | | | सूर्यसंबंधानें १२ व्या को. हून ± | | | केरोपंती ग्र. सा. कोष्टकावरून सायन. | | | | अयनांश १८।२८ धन करून केरोपंतीवरून निरयन. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ७ | | | ८ | | | | ९ | | | १० | | | ११ | | | | १२ | | | |
| | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि | अं. | क. | वि. | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि. |
| रवि. | ० | | | ० | ० | ५१ | ४९ | +० | ५१ | ४९ | ० | | | ११ | २१ | ४३ | ६ | ० | ० | ० | ० |
| चंद्र. | −० | २१ | ५२ | ९ | ११ | ३१ | ४६ | +० | ३८ | ५८ | −० | १२ | ४७ | ९ | १० | ३९ | ५४ | ९ | १० | ५२ | ४८ |
| चंद्रोच्च. | −४ | १५ | १६ | १ | ७ | २१ | ३ | +१ | १० | ३३ | +० | १८ | ४८ | १ | ५ | ५३ | ३६ | १ | ६ | १० | ३० |
| राहु. | −४ | १६ | ५१ | ११ | २३ | २३ | १४ | +० | २८ | ५६ | −० | २२ | ४१ | ११ | २२ | ३७ | २५ | ११ | २२ | ५५ | १८ |
| मंगळ | +२ | १९ | ३९ | ० | ८ | ४ | ४९ | +० | ५९ | ४९ | +० | ८ | ० | ० | ६ | ४८ | ६ | ० | ७ | ५ | ० |
| बुध. | +१४ | ३३ | २७ | ६ | ० | ४१ | २ | −२ | ४१ | १० | −३ | ३२ | ५१ | ६ | ३ | ५ | १८ | ६ | ३ | २२ | १२ |
| गुरु. | −१ | २८ | ३८ | ६ | ७ | २८ | ९ | −० | १ | ४९ | −० | ५३ | ३० | ६ | ७ | १३ | ० | ६ | ७ | २१ | ५४ |
| शुक्र. | −३ | ३० | २८ | ११ | २६ | ५७ | १२ | +० | ३९ | ३६ | −० | १२ | ९ | ११ | २६ | ० | ४२ | ११ | २६ | १७ | ३६ |
| शनि | +२ | ५ | १४ | १ | १९ | ० | १ | +० | ३९ | ५९ | −० | ११ | ५० | १ | १८ | ३ | १२ | १ | १८ | २० | ६ |

नाक्षत्र प्रदक्षिणेस लागणारे काळ.

| ग्रह | सांप्रतचा सूर्यसिद्धांत. | | | | ब्रह्मगुप्तसिद्धांत. | | | | टालमी. | | | | आधुनिक युरोपियन. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | दि. | घ. | प. | वि. | दि. | घ. | प. | वि. | दि. | घ. | प. | वि. | दि. | घ | प. | वि. |
| रवि | ३६५ | १५ | ३१ | ३१·४ | ३६५ | १५ | ३० | २२·५ | ३६५ | १५ | २४ | ३१·५ | ३६५ | १५ | २२ | ५६·८७ |
| चंद्र | २७ | १९ | १८ | १·६ | २७ | १९ | १८ | ०·२५ | २७ | १९ | १८ | ०·२ | २७ | १९ | १७ | ५८·८६३ |
| चंद्रोच | ३२३२ | ५ | ३७ | १३·६ | ३२३२ | ४४ | २ | ४५ | ३२३२ | २४ | ४० | ३४ | ३२३२ | ३४ | ३१ | १४·०८८ |
| राहु | ६७९४ | २३ | ५९ | २३·५ | ६७९२ | १५ | १४ | १४·७ | ६७९१ | ५८ | १६ | ३८·५ | ६७९८ | १६ | ४४ | २४·००० |
| बुध | ८७ | ५८ | १० | ५५·७ | ८७ | ५८ | ११ | ४३·७ | ८७ | ५८ | ११ | ४७·२ | ८७ | ५८ | ९ | २४·९९८ |
| शुक्र | २२४ | ४१ | ५४ | ५०·६ | २२४ | ४१ | ५२ | ३४·७ | २२४ | ४२ | ९ | ५२ | २२४ | ४२ | २ | ४७·४८६ |
| मंगळ | ६८६ | ५९ | ५० | ५·८७ | ६८६ | ५२ | ५२ | ३३·७ | ६८६ | ५८ | ४९ | ५०·२ | ६८६ | ५८ | ४६ | २·५१८ |
| गुरु | ४३३२ | १९ | १४ | २०·९ | ४३३२ | १४ | २४ | १९·२ | ४३३२ | ४५ | २२ | ५६·२ | ४३३२ | ३५ | ५ | १७·४९ |
| शनि | १०७६५ | ४६ | २३ | ४·१ | १०७६५ | ४८ | ५४ | ५१·२ | १०७५८ | ४४ | ३० | ३७·२ | १०७५९ | १३ | १० | ५७·४९ |

सिद्धांतांतील ग्रहांचें १० व्या कोष्टकांत दाखविलेलें ( सूर्यसंबंधीं तुलनेचें ) अंतर बुधाचें मात्र बरेंच आहे. गुरूचें ५३ कला आहे आणि बाकीच्यांचें २२ कलांच्या आंतच आहे.

एकंदरीत पाहतां सांप्रतच्या सूर्यसिद्धांताखेरीज बाकीच्यांचे ग्रह शके ४२१च्या सुमारास चांगले शुद्ध येत होते असें ह्मणण्यास हरकत नाहीं. चंद्र तर सर्वांचा फारच सूक्ष्म सांपडला आहे. ब्रह्मगुप्ताखेरीज सर्वांचे चंद्रभगण सारखेच आहेत. परंतु वर्षमान निराळें असल्यामुळें वर दिलेल्यांत सांप्रतच्या सूर्यसिद्धांताचा चंद्र इतरांहून थोडा निराळा आला आहे. बुधाचें अंतर सर्वांचें बरेंच आहे. याचें कारण तो सूर्याच्या सन्निध नेहमीं असणार. यामुळें त्याचे वेध घेण्याची संधि फार थोडी सांपडणार. हेंच दिसतें.

युरोपियन ग्रंथांवरून आलेले मध्यम ग्रह आणि आमच्यांवरून आलेले मध्यम ग्रह यांच्या तुलनेवरून आमच्या ग्रंथांची शुद्धाशुद्धता ठरविणें ही रीति सर्वांशीं आणि सर्वत्र निर्भय नाहीं हें बेंटलीच्या ग्रंथकालनिर्णयपद्धतीचें विवेचन वर (पृ. १७२ इत्या.) केलें आहे त्यावरून दिसून येईल. परंतु आमचे ग्रंथ दृक्प्रत्ययास कितपत येत होते हें पाहण्यास याहून दुसरा चांगलासा मार्ग नाहीं ह्मटलें तरी चालेल, ह्मणून तोच एथें स्वीकारिला आहे.

आमच्या निरनिराळ्या ग्रंथांतील भगणादि मानें पूर्वी कांहीं दिलीं आहेत व कांहीं पुढें येतील. परंतु सांप्रतच्या युरोपियन मानांशीं तुलना करतां येण्याकरितां एका नाक्षत्र प्रदक्षिणेस ( भगणास ) लागणारे काल युरोपियन व आमचे असे पुढें पृ. २०३ यांत दिले आहेत.

यांतील टालमीचीं मानें बर्जेसच्या सूर्यसिद्धांताच्या भाषांतरावरून घेतलीं आहेत. सूर्यसिद्धांत आणि ब्रह्मगुप्तसिद्धांत ( अथवा सिद्धांतशिरोमणि ) यांचीं मानें-ही त्यावरूनच घेतलीं आहेत. माझी गणित करण्याची रीति निराळी असल्यामुळें हीं मानें काढण्याचें कधीं कारण पडलें नाहीं यामुळें तीं तपासून पाहिलीं नाहींत. तथापि त्यांत बहुधा चूक नाहीं.* सांप्रतचीं युरोपियन मानें लुमिसच्या Practical Astronomy या पुस्तकावरून मीं काढिलीं आहेत.

सांप्रतचीं युरोपियन मानें पाहिलीं असतां दिसतें कीं, आमच्या सूर्यसिद्धांताचें वर्ष सुमारें ८ पळें ३४·५ विपळें जास्त आणि ब्रह्मसिद्धांताचें ७ पळें २५·६ विपळें जास्त आहे. चंद्राची गति फार असूनही तींत बहुधा चूक नाहीं ह्मटली तरी चालेल. गुरुभगणास सुमारें ४ दिवसांचा आणि शनीच्यास ६ दिवसांचा फरक आहे. बाकीचे फरक १ दिवसाच्या आंत आहेत.

टालमी.

टालमीनें दिनगति दिल्या आहेत त्यांवरून, त्यानें मानलेली संपातगति ( वर्षास ३६ विकला ) हिशेबांत घेऊन टालमीचीं मानें काढिलीं आहेत असें प्रो० व्हिटने म्हणतो. त्यांचें आमच्या सिद्धांतांतील मानांशीं मुळींच साम्य नाहीं. यावरून **टालमीच्या ग्रंथांतली ग्रहगतिस्थिति आमच्या सिद्धांतांत घेतलेली नाहीं** असें सिद्ध होतें.

* कदाचित् असली तरी माझें या पुस्तकांतील कोणतेंही गणित या मानांवरून केलेलें नाहीं.

शके ४२१ ( कलिगतवर्ष ३६०० ) या वर्षीचीं मंद्रोचें आणि पात.

| ग्रह. | केरोपंती ग्रहसाधनाचीं कोष्टकें या पुस्तकावरून. | | | प्रथमार्यसिद्धांत. | | | | सांप्रतचा सूर्यसिद्धांत. | | | | | ब्रह्मगुप्तसिद्धांत. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | स्थिति. | | केरोपंतीहून जास्तकमी. | | स्थिति. | | | केरोपंतीहून जास्तकमी | | स्थिति. | | | केरोपंतीहून जास्तकमी | |
| १ | २ | | | ३ | | ४ | | ५ | | | ६ | | ७ | | | ८ | |
| उच्चें. | रा. | अं. | क. | रा. | अं. | अं. | क. | रा. | अं. | क. | अं. | क. | रा. | अं. | क. | अं. | क. |
| रवि | २ | १७ | ७ | २ | १८ | + ० | ५३ | २ | १७ | १५ | + ० | ८ | २ | १७ | ५४ | + ० | ४७ |
| मंगळ | ४ | ८ | ११ | ३ | २८ | −१० | ११ | ४ | १० | १ | + १ | ५० | ४ | ८ | २३ | + ० | १२ |
| बुध | ७ | २४ | १ | ७ | ० | −२४ | ० | ७ | १० | २६ | −१३ | ३५ | ७ | १४ | ५३ | − ९ | ८ |
| गुरु | ५ | २० | ३८ | ६ | ० | + ९ | २२ | ५ | २१ | १६ | + ० | ३८ | ५ | २२ | ३१ | + १ | ५३ |
| शुक्र | ९ | २१ | ३ | ३ | ० | −२०१ | ३ | २ | १९ | ४९ | −२११ | १४ | २ | २१ | १४ | −२०९ | ५९ |
| शनि | ८ | ५ | १२ | ७ | २६ | − ९ | १२ | ७ | २६ | ३७ | − ८ | ३५ | ८ | २० | ५४ | + १५ | ४२ |
| पात. | | | | | | | | | | | | | | | | | |
| मंगळ | १ | ८ | ९ | १ | १० | + १ | ५१ | १ | १० | ५ | + ९ | ५६ | ० | २१ | ५५ | −१६ | १४ |
| बुध | १ | ० | १८ | ० | २० | −१० | १८ | ० | २० | ४४ | − ९ | ३४ | ० | २१ | १२ | − ९ | ६ |
| गुरु | २ | २५ | ३० | २ | २० | − ५ | ३० | २ | १९ | ४१ | − ५ | ४९ | २ | २२ | २ | − ३ | २८ |
| शुक्र | २ | ३ | ४० | २ | ० | − ३ | ४० | १ | २९ | ४६ | − ३ | ५४ | १ | २९ | ४९ | − ३ | ५१ |
| शनि | ३ | १० | १३ | ३ | १० | − ० | १३ | ३ | १० | २५ | + ० | १२ | ३ | १३ | १३ | + ३ | ० |

## कलियुगारंभींचीं मंदोच्चें आणि पात.

| ग्रह. | सांप्रतचे सूर्यादि पांच सिद्धांत | | | | ब्रह्मगुप्तसिद्धांत | | | | द्वितीय आर्यसिद्धांत | | | | पराशरसिद्धांत | | | | केरोपंती ग्र. सा. को. वरून गणित | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मंदोच्चें. | रा. | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि | रा. | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि. | रा. | अं. | क. | वि. |
| रवि | २ | १७ | ७ | ४८ | २ | १७ | ४५ | ३६ | २ | १७ | ४५ | ३६ | २ | १७ | ४५ | ३६ | ० | १५ | १२ | ६ |
| मंगळ | ४ | ९ | ५७ | ३६ | ४ | ८ | १८ | १४ | ४ | ३ | ५० | २४ | ४ | २ | ४३ | २६ | २ | १ | ११ | ० |
| बुध | ७ | १० | १९ | १२ | ७ | १४ | ४७ | २ | ७ | ० | १४ | २४ | ७ | ० | ४० | १९ | ५ | २७ | ४६ | १८ |
| गुरु | ५ | २१ | ० | ० | ५ | २२ | १५ | ३६ | ५ | २२ | ४८ | ० | ५ | २२ | ३५ | २ | ३ | २३ | ५४ | ४० |
| शुक्र | २ | १९ | ३९ | ० | २ | २१ | २ | १० | २ | २० | ३८ | २४ | २ | २० | ४२ | ४३ | ८ | २ | २६ | ३० |
| शनि | ७ | २६ | ३६ | ३६ | ८ | २० | ५३ | ३१ | ७ | २३ | ९ | ३६ | ७ | २८ | १४ | ५३ | ५ | २९ | ७ | ३६ |
| पात. | | | | | | | | | | | | | | | | | | | | |
| मंगळ | १ | १० | ८ | २४ | ० | २१ | ५९ | ४६ | १ | १० | १९ | १२ | १ | ९ | ३ | ३६ | ० | १० | ४९ | ० |
| बुध | ० | २० | ५२ | ४८ | ० | २१ | २० | ५३ | ० | २० | ९ | ३६ | ० | २१ | १ | २६ | ११ | १७ | ० | ० |
| गुरु | २ | १९ | ४४ | २४ | २ | २२ | २ | ३८ | २ | २० | ३८ | २४ | २ | २१ | ४३ | १२ | १ | १९ | ४८ | ६ |
| शुक्र | २ | ० | १ | ४८ | २ | ० | ५ | २ | २ | ० | २८ | ४८ | २ | ० | ५ | २ | १ | २ | ३९ | ५४ |
| शनि | ३ | १० | ३७ | १२ | ३ | १३ | २३ | ३१ | ३ | १० | ४८ | ० | ३ | १० | २६ | २४ | २ | ९ | ० | ० |

मंदोच्चें आणि पात यांची वर्षगति.

| ग्रह. | युरोपियन सूक्ष्म मानानें. | | | सूर्यसिद्धांताप्रमाणें. |
|---|---|---|---|---|
| | सायन. | वास्तविक निरयन. | आमच्या निरयनमानानें मानली पाहिजे ती. | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| उच्चें. | विकला. | विकला. | विकला | विकला. |
| रवि. | + ६१·५ | + ११·२४ | + १·५ | + ०·११६१ |
| मंगळ | + ६५·७ | + १५·४६ | + ५·७ | + ·०६१२ |
| बुध | + ५६·१ | + ५·८१ | − ३·९ | + ·११०४ |
| गुरु | + ५६·९ | + ६·६५ | − ३·१ | + ·२७ |
| शुक्र | + ४७·० | − ३·२४ | − १३·० | + ·१६०५ |
| शनि | + ६९·६ | + १९·३१ | + ९·६ | + ·०११७ |
| पात. | | | | |
| मंगळ | + २५·० | − २५·२२ | − ३५·० | − ०·०६४२ |
| बुध | + ४०·२ | − १०·०७ | − १९·८ | − ·१४६४ |
| गुरु | + ३४·३ | − १५·९० | − २५·७ | − ·०५२२ |
| शुक्र | + २९·७ | − २०·५० | − ३०·३ | − ·२७०९ |
| शनि | + ३०·७ | − १९·५४ | − २९·३ | − ·१९८६ |

संपातगति ५०·२ विकला मानून ही गति काढिली आहे. परंतु आमच्या ग्रंथांत संपातगति ६० विकला मानिली आहे. ह्मणून वरील कोष्टकांतील चवथ्या कोष्टकांत जी गति दिली आहे तितकी आमच्या ग्रंथांतील वर्षांत वास्तविक गति आहे. आणि युरोपियन गतींची आमच्या गतीशीं तुलना करणें तर हिशीं केली पाहिजे. त्याप्रमाणें केली तरी सूर्यसिद्धांताच्या गति बऱ्याच चुकल्या आहेत हें खरें. इतर सिद्धांतां-

सर्व ग्रहांचीं मंदोच्चें आणि पात कलियुगारंभींचे आणि शके ४२१ (गतकलि ३६००) या वर्षींचे निरनिराळ्या ग्रंथांचे २०४ आणि २०५ या पृष्ठांवरील कोष्टकांत दिले आहेत. रॉ० व्हिटने यानें टालमी आणि सूर्यसिद्धांत यांचीं उच्चें आणि पात एकत्र देऊन तीं हिंदूंनीं टालमीवरून किंवा त्याच्या पूर्वीच्या ग्रीक ग्रंथांवरून घेतलीं असतील असें दर्शविलें आहे. परंतु त्याचें म्हणणें चुकीचें आहे हें दाखविण्याकरितां टालमीचीं उच्चें आणि पात, आणि इ. स. १४८ (शक वर्ष ७० ) या म्हणजे टालमीच्या वेळचे केरोपंती पुस्तकावरून आधुनिक युरोपियन मानानें निघणारे उच्चपात यांची तुलना खालील कोष्टकांत केली आहे.

[illegible]

टालमीच्या ( शके ७० ) उच्चपातांची केरोपंतीवरून निघणाऱ्यांशीं तुलना

| ग्रह. | केरोपंतीवरून (सायन.) | | | टालमीची. स्थिति. | | | टालमीची. केरोपंतीहून कमजास्त. | | केरोपंतीवरून (सायन.) | | | टालमीची. स्थिति. | | | टालमीची. केरोपंतीहून कमजास्त. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | | | ३ | | | ४ | | २ | | | ३ | | | ४ | |
| | उच्च. | | | | | | | | पात. | | | | | | | |
| | रा. | अं. | क. | रा. | अं. | क. | अं. | क. | रा. | अं. | क. | रा. | अं. | क. | अं. | क. |
| रवि | २ | ११ | ५ | २ | ५ | ३० | − ५ | ३५ | | | | | | | | |
| मंगळ | ४ | १ | ३९ | ३ | २५ | ३० | − ६ | ९ | १ | ५ | २९ | ० | २५ | ३० | − ९ | ५९ |
| बुध | ७ | १८ | ३२ | ६ | १० | ० | − ३८ | ३२ | ० | २६ | ५ | ० | १० | ० | − १६ | ५ |
| गुरु | ५ | १५ | ७ | ५ | ११ | ० | − ४ | ७ | २ | २२ | १ | १ | २१ | ० | − ३१ | १ |
| शुक्र | ९ | १६ | १८ | १ | २५ | ० | −२३१ | १८ | २ | ० | ३९ | १ | २५ | ० | − ५ | ३९ |
| शनि | ७ | २८ | ४५ | ७ | २३ | ० | − ५ | ४५ | ३ | ७ | २८ | ६ | ३० | ० | +८५ | ३२ |

यांतील कलियुगारंभ आणि कलिगत वर्ष ३६०० या दोनही कालचीं आमच्या सिद्धांतांचीं मंदोच्चें आणि पात (पृ. २०४।२०५) पाहिले असतां दिसेल कीं ३६०० वर्षांत त्यांत फरक फार थोडा पडला आहे. असें होण्याचें कारण त्यांची गति फार थोडी आहे. आमच्या सिद्धांतांप्रमाणें कोणत्याही ग्रहाचें मंदोच्च आणि पात यास १३००० वर्षांत एक अंशाहून जास्त गति नाहीं. संपात हें आरंभस्थान मानिलें तर, म्हणजे सायनमानानें, गति बरीच आहे हें या दोन कोष्टकांतील केरोपंती पुस्तकावरून काढलेले अंक पाहिले म्हणजे समजेल. परंतु नाक्षत्रभगणमानानें म्हणजे निरयनमानानें गति फार अल्प आहे.

पुढील पृ. २०७ यांतील कोष्टकांत मंदोच्चें आणि पात यांची आधुनिक युरोपियन मानानें सूक्ष्म काढलेली सायन मानाची आणि वास्तविक निरयन मानाची वर्षगति दिली आहे.*

---

* ही Practical Astronomy by Loomis वरून घेतली आहे.

इ. स. सुमारें १५० या वर्षी सायन रव्युच्च ७१ अंश येतें. इतर कोणत्याही रीतीनें ६५।३० येईलसें वाटत नाहीं. आमच्या कोणत्याही सिद्धांताचें रव्युच्च एक अंशाहून जास्त चुकलें नाहीं. टालमीची ५½ अंश चुकी मोठ्या आश्चर्याची आहे. तेव्हां अशा या टालमीच्या उच्चपातांवरून किंवा त्याच्या पूर्वींच्या ग्रीक ग्रंथांवरून हिंदूंनीं तीं मानें घेतलीं हें प्रो० व्हिटनचें ह्मणणें चुकीचें आहे. स्वतः त्यानें सांप्रतच्या युरोपियन ग्रंथांवरून टालमीच्या वेळची, शके ४२१ च्या सुमाराची किंवा कोणत्याच वेळची उच्चपातस्थिति काढून तुलना केली नाहीं. ती स्थिति काढणें फार त्रासाचें आणि भानगडीचें आहे* असें तो म्हणतो. परंतु त्यांत विशेष काठिन्य आहे असें नाहीं. व्हिटनेची एकंदर योग्यता पाहिली असतां त्यासंबंधें गणित करणें हें काम त्याला अवघड होतें असें नाहीं. परंतु त्याविषयीं त्यानें विचार केला नाहीं हें खचित. अर्थात् करावी तशी तुलना न करितां काढलेलें अनुमान चुकीचें असणारच टालमीचे आणि आमच्या सिद्धांताचे उच्चपातस्थितीचे नुस्ते अंक—ज्यांत ३ पासून ८२ अंशांपर्यंत अंतर आहे, ते पाहिले असतांच दिसून येईल कीं दोहोंचा कांहीं संबंध नाहीं. केवळ सूर्याच्या उच्चावरूनच ह्याविषयीं खात्री होईल. सूर्याचें उच्च आमच्या सिद्धांतकारांच्या मतें शके ४२१ पासून आजपर्यंत ७८ अंशांच्या जवळ जवळ आहे. त्याच्या पूर्वी किती वर्षे तितकें असेल तें असो. इतर ग्रहांच्या उच्चांत निरनिराळ्या सिद्धांतांत पुष्कळ अंशांचें अंतर आहे परंतु सूर्याच्यांत नाहीं. टालमीच्यावरून जर हिंदूंनीं उच्चें घेतलीं असतीं तर टालमीचें रव्युच्च ६५ अंशांचें हिंदूंनीं ७८ अंश कसें केलें असतें? एखाद्या ग्रंथावरून ग्रहादि घेणें तर आमचे ग्रंथकार विकलांचीही कसर जाऊं देत नाहींत असें या पुस्तकांत पुढें जागजागीं दिसून येईल. यावरून आमच्या ग्रंथांतील उच्चें स्वतंत्रपणें काढिलेलीं आहेत असें सिद्ध होतें. आमच्याच निरनिराळ्या सिद्धांतांच्या उच्चपातांमध्येंही बरेंच अंतर आहे. यावरून आमच्या सिद्धांतकारांनीं एकमेकांचींही मानें घेतलीं नाहींत, तर प्रत्येकानें स्वतंत्रपणें काढिलीं असें दिसून येतें. व्हिटने ह्मणतो कीं, उच्चें आणि पातें यांसारखी कठिण गोष्ट स्वतः काढण्याची किंवा दुसऱ्याची घेतली असतां कालांतराच्या मानानें तींत सुधारणा करून घेण्याची योग्यता हिंदूंच्या अंगीं नाहीं. परंतु उलट टालमीविषयीं असें ह्मणतां येईल. टालमीनें दिलेलें रव्युच्च ६५।३० हें त्याच्या पूर्वींचा जो हिपार्कस (इ. स. पूर्वी १५०) याच्या वेळीं होतें. यावरून कदाचित् त्याच्यावरून टालमीनें तें, त्यांत आपल्या काळच्या स्थितीस योग्य असा फेरफार न करितां, घेतलें असेल. टालमीचे इतर ग्रहांचे उच्चपातही हिपार्कसच्या वेळच्यांशीं बरेच जमतात असें गणितानें निघतें. यावरून तेही टालमीनें हिपार्कसचे, योग्य फेरफार न करितां, घेतले असें म्हणतां येईल. परंतु हिपार्कसच्या वेळीं किंवा त्यापूर्वी उच्चपातस्थिति काय मानलेली होती हें सांप्रत उपलब्ध नाहीं. तेव्हां यासंबंधें निश्चितपणें कांहीं म्हणतां येत नाहीं. टालमीची उच्चपातस्थिति चुकीची असतां, तिचें हिंदुग्रंथांवरून निघणाऱ्या स्थितीशीं साम्य नसतां, व टालमीच्या पूर्वी उच्चपातस्थिति काय मानीत होते हें सांप्रत माहित† नसतां, हिंदूंनीं टालमीवरून किंवा त्याच्या पूर्वी-

* "Intricate and labourics a calculation" (बर्जेसचें सू. सि. भा. पृ. ३८३)
† व्हिटनेच्या लिहिण्यावरून मी असें म्हणतों.

फार तर सारीं अशुद्ध आहेत म्हटलें तरी चालेल. कोणतेंही उच्च किंवा पात यांची गति आमच्या ग्रंथांप्रमाणें एका वर्षांत विकलेच्या निराळ्या हिशाहून जास्त नाहीं. युरोपियन मानानें उच्चगति विकलेहून जास्त आहेत. आतां यासंबंधें आमच्या ग्रंथांस, फारतर वर्गील अंक पाहून तोंडानें दोष देणें फार सोपें आहे. परंतु आकाशांत एक विकला समजण्यास सांप्रतच्या सूक्ष्मयंत्रांनींही किती प्रयास पडतात हें ज्यास माहित आहे तो तसा दोष देणार नाहीं. कांहीं ग्रहनक्षत्रांच्या युति मीं प्रत्यक्ष नुसत्या डोळ्यांनीं पाहिल्या आहेत. त्यांवरून माझ्या अनुभवास असें आलें आहे कीं, सूक्ष्म दृष्टीनें ज्या दोन ग्रहादिकांमध्यें सुमारें ५ कला ( ३०० विकला ) किंवा याहूनही कांहीं जास्त अंतर दिसतें ते ग्रह नुसत्या डोळ्यांनीं एकमेकांस स्पर्श आलेले दिसतात. म्हणजे त्यांमध्यें अंतर मुळींच दिसत नाहीं. तेव्हां आमच्या ग्रंथांतील कोणत्याही मानांची युरोपियन सूक्ष्म मानांशीं तुलना करितांना ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे. आणि त्याप्रमाणें उच्चें आणि पात यांसंबंधें आमच्या ग्रंथांस दोष न देतां त्यांची तारीफच केली पाहिजे. उच्चें आणि पात यांची गति फार सूक्ष्म आहे इतकें आमच्या ग्रंथकारांच्या लक्ष्यांत आलें होतें, हा आपण त्यांचा गुण घेतला पाहिजे. त्यांच्या वेळचे उच्च आणि पात यांचे भोग त्यांच्या ग्रंथांवरून जे निघतात ते कितपत सूक्ष्म आहेत एवढें मात्र पाहिलें पाहिजे. शके ४२१ मधील आमच्या ग्रंथांवरून येणारी उच्चपातस्थिति वर ( पृ. २०५ ) दिली आहे. आणि तिची केरोपंती पुस्तकावरून येणाऱ्या स्थितीशीं तुलना करून कमजास्त अंतर दिलें आहे. त्यावरून आमच्या सिद्धांतांतील स्थिति खऱ्या स्थितीच्या पुष्कळ जवळ आहे असें दिसून येईल. केरोपंतीवरून आलेली स्थिति सायन आहे. तरी श. ४२१ मध्यें अयनांश सुमारें २० कला मात्र असल्यामुळें ती निरयन आहे असें समजून तुलना करण्यास हरकत नाहीं. सूर्याचें उच्च तर फारच थोडें चुकलें आहे. शुक्राच्या उच्चामध्यें मात्र फार चुकी दिसते. तिचें कारण काय असेल तें असो. ती एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. परंतु बाकीचीं उच्चें पाहिलीं तर पहिल्या आर्यभटाच्यांत बुधाचें उच्च २४ अंश कमी आहे, बाकीचीं १० अंशांच्या आंतच कमजास्त आहेत. सूर्यसिद्धांताचीं याहून शुद्ध आहेत. त्यांत बुधाचें १३ अंश कमी, आणि शनीचें ८ अंश कमी आहे. मंगळ व गुरु यांचीं तर फारच थोडीं चुकलेलीं आहेत. ब्रह्मगुप्ताचीं ही सूर्यसिद्धांताइतकीं किंवा त्याहून जास्त शुद्ध आहेत. पृ. २०६ यांतील कोष्टकांत टालमीच्या उच्चांची केरोपंतीशीं तुलना केली आहे. टालमीचीं इतर मानें सायन आहेत त्याप्रमाणें हीं सायन असावीं असें अनुमान होतेंच. आणि त्याप्रमाणेंच रवीच्या उच्चावरूनही तें स्पष्ट आहे. म्हणून त्यांचा केरोपंतीवरून निघालेल्या सायनांशीं तुलना करण्यास हरकत नाहीं. आणि ती तुलना पाहिली असतां सहज दिसतें कीं त्याच्याही शुक्राच्या उच्चांत अतिशय चुकी असून शिवाय एकंदरींत त्याचीं उच्चें सूर्यसिद्धांत आणि ब्रह्मसिद्धांत यांहून जास्त चुकलीं आहेत.

पात ( पृ. २०५ ) पाहिले तर आर्यभटाचे सरासरीनें ४ अंश चुकीचे आहेत. सूर्यसिद्धांताचे ४ अंश चुकीचे आणि ब्रह्मगुप्ताचे ७ अंश चुकीचे आहेत. आणि टालमीचे ( पृ. २०६ ) तर ३० अंश चुकीचे आहेत. त्याचे शनि गुरुपात फारच चुकीचे आहेत. त्याचें स्पष्ट ६५ अंश ३० कला आहे. त्याच्या वेळीं म्हणजे

असला पाहिजे. याच्या मृत्युकालाविषयीं एक आधार देत असतात. तो असा कीं

नवाधिकपंचशतसंख्यशाके वराहमिहिराचार्यो दिवं गतः ॥

हें वचन मूळचें श्लोकबद्ध आहे कीं गद्य आहे हें समजत नाहीं. श्लोकबद्ध असेल तर तें फारच अशुद्ध आहे. हें ब्रह्मगुप्तटीकाकार पृथुस्वामी यानें दिलें आहे असें कोणी म्हणतात; परंतु ब्रह्मगुप्तसिद्धांतावरील पृथूदकटीका पहिल्या १० अध्यायांवरची मीं वाचली तींत हें वचन नाहीं. १० अध्यायांखेरीज गोलाध्यायावरील त्याची टीका व इतर अध्यायांवरची त्याची टीका मीं वाचली नाहीं. तींत किंवा खंडखाद्यावरील पृथूदकटीकेंत हें वचन असलें, तर नकळे. या पृथूदकाचा काल सुमारें शके ९०० आहे. तेव्हां वरील वचन पृथूदकाचेंच असेल तर स्वतः वराहाच्या ग्रंथांत आलेल्या ४२७ शकापेक्षां त्याच्या मागाहून चारशें वर्षांनीं झालेल्याच्या लिहिण्यावर भरंसा ठेवणें तो विचारानेंच ठेविला पाहिजे. प्रो० वेबर* म्हणतो कीं ब्रह्मगुप्तटीकाकार आमराज हा म्हणतो कीं वराहमिहिर शके ५०९ मध्यें मृत्यु पावला. त्यानें मूलवचन दिलें नाहीं, परंतु तें बहुधा वरीलच असावें. तेव्हां हें वचन पृथूदकाचें कीं आमराजाचें हाच संशय. आमराजाचें आणखी एक म्हणणें वेबरनें दिलें आहे कीं शतानंदाचा जन्म शके ९१७ मध्यें झाला. परंतु शतानंदाच्या भास्वतीकरणांत आरंभवर्ष शके १०२१ आहे. दुसरा एखादा शतानंद प्रसिद्ध नाहीं. तेव्हां शतानंदासंबंधें आमराजाचें म्हणणें अगदीं चुकीचें आहे. अर्थात् वरील वचन आमराजाचें असेल तर त्याचीही योग्यता तितकीच. दुसरें असें कीं आमराज शके ९१७ नंतर म्हणजे वराहानंतर सुमारें चार पांच शतकांनीं झाला. म्हणूनही त्याच्या म्हणण्याची योग्यता कमी. आणखी आमच्या लेखी पुस्तकांच्या शुद्धाशुद्धतेच्या मानानें पाहिलें तर वरील वचन गद्यात्मक असल्यास तें जसेंच्या तसेंच आजपर्यंत आलें असेल याविषयींही संशयच. तर अशा ह्या वचनावर विश्वास ठेवून वराहमिहिर शके ५०९ मध्यें मृत्यु पावला असें म्हणण्यापेक्षां स्वतः त्याच्याच ग्रंथांतील शक ४२७, ज्याविषयीं त्या वेळच्या दिलेल्या ग्रहस्थितीवरून संशयास जागाच नाहीं, तो विश्वसनीय होय हें स्पष्ट आहे. आतां हें खरें आहे कीं, करणग्रंथांत जो शक घेतला असतो त्याच वर्षी तो ग्रंथ पूर्ण झाला असेंच असेल असें नाहीं. केरोपंतांच्या ग्रंथांत शके १७७२ मधील उदाहरणें आहेत आणि तो शके १७८२ मध्यें छापला आहे. त्याप्रमाणें वराहाचा ग्रंथ शके ४२७ च्या मागाहूनही पूर्ण झाला असेल. तसें असलें तथापि शके ४२७ मध्यें किंवा त्या सुमारास मागें पुढें एक दोन वर्षांत त्या ग्रंथासंबंधें गणित करण्यास आरंभ झाला असला पाहिजे. एऱ्हवीं शके ४२७ हें आरंभवर्ष मानण्याचें कारण नव्हतें. ४२७ मध्यें त्याचा जन्मच नसेल, तर तो शक घेण्याचा अगदींच संभव नाहीं. यावरून शके ४२७ च्या नंतर त्याचा जन्म झाला नाहीं हें उघड आहे. इतकेंच नाहीं तर मला वाटतें कीं तो त्या वर्षी निदान १५।१६ वर्षांचा असला पाहिजे. आणि तें वर्ष त्यानें उदाहरणांस घेतलें असलें पाहिजे. म्हणून करणग्रंथांत तें आलें. एऱ्हवीं येण्याचा फारसा

---

* वेबरचें पुस्तक टीप २९३ पहा.

थत मीहांतिल उच्चपात घेतले हें म्हणणें योग्य आहे कीं काय याचा विचार वाचकांनीं करावा. टालमीचे उच्चपाताचे अंक — जे हिपार्कसचे त्यानें घेतले असतील असें संभवतें ते—आणि आमच्या ग्रंथांवरून येणारे, यांत उच्चांत ३ पासून ३० अंशपर्यंत आणि पातांत ४ पासून ८२ अंशपर्यंत अंतर आहे. हिपार्कसच्या ( इ. स. पूर्वी १५० ) वेळेपासून शके ४२१ ( इ. स. ५०० ) पर्यंत ६५० वर्षांत इतकी गति झाली हें त्यांनीं काढून तितका फेरफार करून आपल्या ग्रंथांत स्थिति दिली असें मानलें तर दोहोंच्या अंकांमध्यें कांहीं नियमित अंतर दिसलें पाहिजे. तसें नाहीं. आणि ६५० वर्षांत इतकी गति होते असें जर त्यांनीं काढलें होतें तर त्यांनीं उच्चपातगति पुष्कळ दिली असती, परंतु ती तर ते १३,००० वर्षांत एक अंशाहून कमीच देतात. यावरून टालमीच्या पूर्वीच्या ग्रंथांवरूनही हिंदूंनीं उच्चपात घेतले नाहींत असें सिद्ध होतें. आमच्या सिद्धांतकारांनीं स्वतंत्रपणें आपापल्या वेळची उच्चपातस्थिति काढली याविषयीं आणखीही प्रमाण आहे. मूळसूर्यसिद्धांतांत उच्चपातांचे कल्पांतील भगण दिले होते कीं नाहीं हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. पंचसिद्धांतिकेंत ते नाहींत. पहिल्या आर्यभटानें ते दिले नाहींत, आपल्या वेळची उच्चपातस्थिति मात्र त्यानें दिली आहे. यावरून उच्चपातांस गति असल्यास अत्यल्प आहे एवढें त्याच्या लक्ष्यांत आलें असावें; परंतु ती गति थोड्या दिवसांत समजणारी नसल्यामुळें त्यानें युगभगण दिले नाहींत. इष्टकालीं रव्युच्च कसें काढावें याविषयीं रीति लिहून त्याच्या गतीविषयीं भास्कराचार्य लिहितो :

> उच्चस्य चलनं वर्षशतेनापि नोपलक्ष्यते किन्त्वाचार्यैश्चंद्रमंदोच्चवदनुमानात् कल्पिता गतिः सा चैवं ॥
> यैर्भगणैः सांप्रताहर्गणादिष्टगणाद्वा एतावदुच्चं भवति ते भगणा युक्त्या कुट्टकेन वा कल्पिताः ॥

याचें तात्पर्य इतकेंच कीं "शंकडों वर्षांनींही उच्चगति अनुभवास येत नाहीं. परंतु चंद्रोच्चगति प्रतीतीस येते त्याप्रमाणें रव्युच्चासही गति असेल असें अनुमान करून, जे भगण मानिले असतां इष्ट कालाची स्थिति* निघते तितके उच्चभगण युक्तीनें कल्पिले." इतर ग्रहांच्या उच्चाविषयीं व पाताविषयीं असेंच समजावें असें भास्कराचार्यानें लिहिलें आहे. यावरून इष्टकालीं उच्चपात कोठे आहेत हें कसें काढावें हें आमच्या सिद्धांतकारांस माहित होतें व त्याप्रमाणें त्यांनीं ते काढून तदनुसार भगण कल्पिले. यावरून **आमच्या सिद्धांतकारांनीं स्वतंत्रपणें उच्चपातांची** आपापल्या कालची **स्थिति काढली** असें सिद्ध होतें.

## वराहमिहिर.

हा एक नामांकित ज्योतिषी होऊन गेला. ज्योतिषाच्या तीनही शाखांवर याचे ग्रंथ आहेत. याच्या कालाविषयीं थोडासा विचार करूं.

काल.

यानें स्पष्टपणें आपला काल कोठे सांगितला नाहीं. परंतु पंचसिद्धांतिकाकरणग्रंथांत गणितास आरंभवर्ष घेतलें आहे तें शक ४२७ आहे असें पूर्वी सांगितलेंच आहे. त्याच वर्षी त्यानें तो ग्रंथ केला असेल तर त्यावेळीं तो निदान २० वर्षांचा असला पाहिजे. त्याहून कमी वयांत तसा ग्रंथ होणें संभवत नाहीं. आणि त्याप्रमाणें पाहिलें तर त्याचा जन्म शके ४०७ च्या सुमारास झाला

* कल्पारंभीं मेषादीं उच्चस्थिति मानून.

वराहमिहिर बृहज्जातकांत ह्मणतोः—

कुलस्थल — आदित्यदासतनयस्तदवाप्तबोधः कापित्थके सवितृलब्धवरप्रसादः ॥
इत्यादि — आवंतिको मुनिमतान्यवलोक्य सम्यग्घोरां वराहमिहिरो रुचिरां चकार ॥९॥

उपसंहाराध्याय.

यावरून त्याच्या पित्याचें नांव आदित्यदास होतें; त्यापासून त्यास ज्ञान प्राप्त झालें होतें; कापित्थक ऐथे त्यास सूर्याचा वरप्रसाद प्राप्त झाला; आणि तो अवंती एथील राहणारा होता; असें निष्पन्न होतें. कापित्थक हें अवंतीच्या आसपास एखादें गांव असेल आणि तेथे तो कांहीं दिवस राहिला असेल. तो सूर्यभक्त होता हें सर्व ग्रंथांत त्यानें आरंभीं मंगलांत मुख्यतः सूर्याचें स्तवन केलें आहे त्यावरून दिसून येतें. त्याचा ज्योतिःशास्त्राचा गुरु त्याच्या पित्याहून निराळा होता असें पंचसिद्धांतिकेंतील पुढील आर्येवरून दिसतें.

दिनकरवसिष्ठपूर्वान् विविधमुनीन् भावतः प्रणम्यादौ ॥
जनकं गुरुं च शास्त्रे येनास्मिन् नः कृतो बोधः ॥ १ ॥

अध्या. १.

तो अवंती ह्मणजे उज्जयिनी एथील रहाणारा होता असें त्याच्या दुसऱ्या स्थलींच्या ४१५ उल्लेखांवरूनही दिसून येतें.

परदेशगमन.

भास्कराचार्य हे यवनदेशांत जाऊन त्यांनीं ज्योतिःशास्त्र संपादिलें अशी कांहीं लोकांची समजूत ऐकण्यांत येते. परंतु त्यांचे ग्रंथ व त्यांच्या पूर्वींचे ग्रंथ यांचा विचार करून पाहतां ही समजूत अगदीं चुकीची आहे. ही गोष्ट कोणी वराहमिहिराविषयीं सांगतात. परंतु त्याचे ग्रंथ व त्यांवरील भटोत्पलाची टीका पाहिली असतां असें दिसतें कीं वराहानें केलेल्या सर्व ग्रंथांतल्या विषयांवर त्याच्या पूर्वींच विपुल ग्रंथ या देशांत झालेले होते. तेव्हां वराहास परदेशांत जाण्याचें कांहीं कारण नव्हतें.

याचे ग्रंथ.

यानें यात्रा, विवाह, गणित (करण), होरा आणि संहिता या विषयांवर ग्रंथ केले. संहिताशाखेवर बृहत्संहिता ह्मणून याचा प्रसिद्ध ग्रंथ आहे तो सर्वांच्या शेवटीं रचिला असें

वक्रानुवक्रास्तमयोदयाद्यास्ताराग्रहाणां करणे मयोक्ताः ।
होरागतं विस्तरतश्च जन्म यात्राविवाहैः सह पूर्वमुक्तं ॥ १० ॥

अध्या १.

या बृहत्संहितेंतील त्याच्या ह्मणण्यावरून दिसून येतें. होराशाखेवरील ग्रंथ वरील श्लोकांत ह्मटला आहे तो बृहज्जातकच होय. बृहज्जातकापूर्वी विवाहावरील ग्रंथ

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )
हल्लमंजरीनामक ग्रंथांतून घेतला असें त्यांनीं सांगितलें. तो श्लोक असाः—स्वस्तिश्रीनृपसूर्यसूनुजशके याते द्विवेदांबरत्रै ३०४२ मानाब्दमिते त्वनेहासि जये वर्षे वसंतादिके ॥ चैत्रे श्वेतदले शुभे वसुतिथावादित्यदासादभूद्वेदांगे निपुणो वराहमिहिरो विप्रो रवेराशिभिः ॥ यांत युधिष्ठिर शक ३०४२ या वर्षी सूर्याच्या आशीर्वादानें आदित्यदासपुत्र वराहमिहिर जन्मला असें ह्मटलें आहे. पंचसिद्धांतिकादिकार वराहमिहिरहा 'आदित्यदासतनय' आणि 'सवितृलब्धप्रसाद' होता. परंतु या श्लोकांतील संवत्सर कोणत्याही पद्धतीनें गणितानीं मिळत नाहीं. यावरून हा श्लोक विश्वसनीय नाहीं.

शंका नाहीं. शके ४२७ मध्यें चैत्रशुक्ल ( अमान्त वैशाख शुक्ल ) प्रति-पदेच्या सुमारास मध्यम मेषसंक्रमण आलें. आणि त्या वेळची मध्यम-स्थिति काढणें सोपें, व अहर्गण शुक्लप्रतिपदेपासून करण्याची रीति हें सोपें. म्हणून शके ४२७ हें वर्ष घेतलें असेल. वस्तुतः ग्रंथ मागाहून झाला असेल, असा एक संभव आहे. परंतु तसें म्हटलें तरी शके ४२७ च्या पूर्वी ४१९ मध्यें व नंतर ४३८ मध्यें मध्यममेषसंक्रमण शुक्लप्रतिपदेच्या सुमारास येतें. ४१९ ते विचारांत नको. ४३८ घेतलें नाहीं. यावरून ४३८ च्या पूर्वीं ग्रंथ झाला असें सिद्ध होतें. पंचसिद्धांतिकेंत आर्यभटाचें नांव आहे आणि त्याचा ग्रंथ शके ४२१ समाप्त आहे. तेव्हां ६ वर्षांत आर्यभटाचा ग्रंथ इतका प्रसिद्ध होण्याचा संभव नाहीं अशी एक शंका येते. परंतु तींत फारसा अर्थ नाहीं. वराहाचा ग्रंथ पुरा हो-ण्यास ४२७ नंतरही पांच चार वर्षे लागण्याचा संभव आहे. तेव्हां त्याच कामाकडे लागलेल्या आणि अवंतीसारख्या प्रसिद्ध राजधानींत राहणाऱ्या प्रख्यात ज्योतिष्याच्या दृष्टीस आर्यभटाचा ग्रंथ पडणें किंवा त्यांतील मतें त्यास क-ळणें असंभवनीय नाहीं. शके ४२७ मध्यें वराहमिहिर स्वतः उदाहरणें करण्यासा-रख्या वयांत होता असें ग्रंथावरून दिसतें. तेव्हां तो १५ वर्षांचा होता असें मानलें तर त्याचें जन्म शके ४१२ मध्यें येतें. आणि मृत्युकाल ५०९ धरला तर त्यावेळीं त्याचें वय ९७ वर्षे येतें. ही गोष्ट अगदीं असंभवनीय आहे असें नाहीं. यावरून एकंदरींत पाहतां वराहाचा जन्मकाल शके ४१२ च्या सुमारें आहे याविषयीं अगदीं संशय नाहीं. कदाचित शके ४२७ हा त्याचा जन्मशक असेल म्हणून त्यानें तें वर्ष घेतलें असेल. तथापि त्याचा जन्म शक ४२७ हून अर्वाचीन नाहीं याविषयीं अ-गदींच संशय नाहीं.

विक्रमाच्या नवरत्नांत म्हणजे विक्रमशकाच्या आरंभाच्या सुमारास एक वराह-मिहिर होता असें

> धन्वंतरिक्षपणकामरसिंहशंकुवेतालभट्टघटखर्परकालिदासाः ॥
> ख्यातो वराहमिहिरो नृपतेः सभायां रत्नानि वै वररुचिर्नव विक्रमस्य ॥

या ज्योतिर्विदाभरणग्रंथांतल्या श्लोकांत आहे. हा ज्योतिर्विदाभरणग्रंथ रघु, कुमार, इत्यादि काव्यें करणाऱ्या प्रसिद्ध कालिदासानें केला असें त्यांत सांगितलें आहे. आणि

> वर्षैः सिंधुरदर्शनांबरगुणैः ३०६८ र्याते कलौ संमिते मासे माधवसंज्ञिते च विहितो ग्रंथक्रियोपक्रमः॥

या श्लोकांत गतकलि ३०६८ म्हणजे विक्रम संवत् २४ या वर्षी या ग्रंथास आरं-भ झाला असें त्यांत म्हटलें आहे. परंतु

> शाकः शराम्भोधियुगो४४५ नितो हृतो मानं खतर्कै६० रयनांशकाः स्युः ॥

ही अयनांश काढण्याची रीति या ग्रंथांत दिलेली आहे. आणि "मत्वा वराहमि-हिरादिमतैः" असें पहिल्या अध्यायांत आहे. यामुळें त्या ग्रंथावर भरंवसा ठेवितां येत नाहीं. या ग्रंथाप्रमाणें विक्रमसंवताच्या आरंभाच्या सुमारास कोणी वराहमि-हिर असल्यास तो पंचसिद्धांतादिकांच्या कर्त्याहून निराळा असला पाहिजे.*

---

* इन्दूर राहणारे वे. शा. रघुनाथशास्त्री टेंभूकर नामक एक ज्योतिषी यांनीं वराहमिहिराच्या कालाविषयीं मला एक श्लोक सांगितला. तो वदर येथें राजाराम व्यंकटेश शास्त्री यांपासून कृत-

( पुढें चालू. )

ग्रंथवर्णन. करण. गणितस्कंधावरील याचा ग्रंथ जो पंचसिद्धांतिका त्याविषयीं बहुतेक विवेचन पूर्वी झालेंच आहे. राहिलेलें एथे करूं.

ग्रहांच्या वक्रानुवक्रास्तोदयादिकांविषयीं मीं करणग्रंथांत सांगितलें अशी त्याची एक आर्या वर दिलीच आहे. तसेंच आणखी तो म्हणतो:

युद्धं यदा यथा वा भविष्यमादिश्यते त्रिकालज्ञैः ॥ तद्विज्ञानं करणे मया कृतं सूर्यसिद्धांतात् ॥

बृ. सं. अ. १७.

आणि या सर्व गोष्टी त्यानें पंचसिद्धांतिकेंत सांगितल्या आहेत. या व दुसऱ्याही प्रमाणांवरून पंचसिद्धांतिका हाच त्याचा करणग्रंथ होय. पंचसिद्धांतिका हें नांव त्यानें त्या ग्रंथांत कोठें दिलें नाहीं.

अष्टादशाभिर्विभक्ता ताराग्रहतंत्रमेतदध्यायैः ॥
भजते वराहमिहिरो ददाति निर्मत्सरः करणं ॥ ६५ ॥

पं. सि. अ. १८.

यांत तो त्यास करण आणि तंत्र असें म्हणतो. पंचसिद्धांतिकेंत आणखी एके स्थलीं त्यानें त्या ग्रंथास करण किंवा तंत्र असें म्हटलें आहे. उत्पलानें त्यास पंचसिद्धांतिका म्हटलें आहे. या ग्रंथांत त्यानें पांच सिद्धांतांचा अनुवाद केला आहे असें पूर्वी दाखविलेंच आहे. सूर्यसिद्धांतोक्त मध्यमग्रहांस त्यानें स्वतःचा एक बीजसंस्कार सांगितला आहे तो असाः

क्षेप्याः शरेंदु १५ विकलाः प्रतिवर्षं मध्यमक्षितिजे ।
दश १० दश गुरोर्विशोध्याः शनैश्चरे सार्धसप्त ७।३० युताः ॥ १० ॥
पंचद्व्या २५ विशोध्याः सिते बुधे खाश्विचंद्र १२० युताः ॥

पंचसिद्धांतिकेंतला कोणताही सिद्धांत वराहमिहिरकृत नव्हे असें पूर्वी सांगितलेंच आहे. आणि या बीजसंस्कारावरून तर ती गोष्ट निर्विवाद सिद्ध होते. जर त्यांतील एखाद्या सिद्धांतांतील ग्रहगतिस्थिति याच्या असत्या तर हा बीजसंस्कार सांगण्याचें कारणच नव्हतें. हा बीजसंस्कार धरून भास्वतीकरणांतले क्षेपक मिळतात असें पूर्वी सांगितलेंच आहे.

मध्यमग्रह वराहमिहिरानें निरनिराळ्या सिद्धांतांतले दिले आहेत. ग्रहणविचारही निरनिराळ्या सिद्धांतांचे निरनिराळे दिले आहेत. तथापि

यत्तत्परं रहस्यं भ्रमति मतिर्यत्र तंत्रकाराणां ॥
तदहमपहाय मत्सरमस्मिन् वक्ष्ये ग्रहं भानोः ॥ ५ ॥
दिक्स्थितिविमर्दकर्णप्रमाणवेलाग्रहाग्रहाविंदोः ॥
ताराग्रहसंयोगं देशांतरसाधनं चास्मिन् ॥ ६ ॥
सममंडलचंद्रोदय यंत्रच्छेद्यानि तांडवच्छाया ॥
उपकरणायक्षज्यावलंबकापक्रमाद्यानि ॥ ७ ॥

अध्याय १.

तसेंच

प्रद्युम्नो भूतनये जीवे सौरे च विजयनंदी ॥ ५९ ॥
भगावतः स्फुटमिदं करणं दृष्टं वराहमिहिरेण ॥

अध्याय १८.

यावरून त्याच्या पूर्वीच्या तंत्रकारांस ज्या कांहीं गोष्टी बरोबर साधल्या नव्हत्या

आणि करणग्रंथ हे झाले होते आणि यात्रा या विषयावरील ग्रंथ बृहज्जातकानंतर झाला असें बृहज्जातकांतील पुढील श्लोकांत आहे.

> [illegible] ॥ ३ ॥
> ...विवाहकालः करणं ग्रहाणां प्रोक्तं पृथक् तद्विपुला न शाखा ॥ ६ ॥

बृ. जा. उपसंहाराध्याय.

यांत करणग्रंथ ह्मटला आहे तो पंचसिद्धांतिका हाच होय. त्यांत पूर्वी एखादा ग्रंथ रचिला असल्याचा उल्लेख नाहीं; यावरून व त्याच्या वयाच्या विचारावरून पंचसिद्धांतिका हाच वराहाचा पहिला ग्रंथ असें दिसतें. त्याच्या विवाहावरील ग्रंथाचें नांव बृहद्विवाहपटल असें होतें, असें उत्पलकृत बृ. सं. टीका अध्या १. यावरून दिसून येतें. तो आणि त्याचा यात्रेवरील ग्रंथ हे सांप्रत उपलब्ध नाहींत. होरा या शाखेवर बृहज्जातकाखेरीज त्याचाच लघुजातक ह्मणून एक ग्रंथ आहे. त्यांत तो ह्मणतोः

> होराशास्त्रं वृत्तैर्मया निबद्धं निरीक्ष्य शास्त्राणि ॥ यत्तस्याप्यार्याभिः सारमहं संप्रवक्ष्यामि ॥ १ ॥

यावरून दिसतें कीं, लघुजातक हा बृहज्जातकाचाच संक्षेप आहे. एकंदरींत याच्या ग्रंथांचा कालक्रम असा लागतो. पंचसिद्धांतिका, विवाहपटल, बृहज्जातक, लघुजातक, यात्रा, बृहत्संहिता. यांतील लघुजातक ग्रंथ कदाचित् यात्रा आणि बृहत्संहिता यांच्या मागाहून झाला असेल. यांपैकीं बृहज्जातक, लघुजातक हे अद्यापि ज्योतिष्यांच्या पुष्कळ प्रचारांत आहेत. आणि ते दोन्ही मुंबई, पुणें, काशी वगैरे ठिकाणीं छापले आहेत. आणखीही कितीक ठिकाणीं कितीक लिपींत छापले असतील. बृहत्संहिता ग्रंथ नुस्तें मूळ डा. केर्न यानें छापिलें आहे, आणि त्यानें त्याचें इंग्रजी भाषांतरही करून रायल एशियाटिक सोसायटीच्या ५ व्या पुस्तकांत छापलें आहे. कलकत्ता एथें बिब्लिओथिका इंडिकामध्यें बृहत्संहितामूळ छापलें आहे. रत्नागिरी एथें जगन्मित्र छापखान्यांत बृहत्संहितामूळ आणि तिचें मराठी भाषांतर छापलें आहे.

ग्रंथप्रसार.

भटोत्पल हा वराहाचा प्रसिद्ध टीकाकार होय. बृहत्संहिता आणि बृहज्जातक हे ग्रंथ स्वतःच उपयुक्त असल्यामुळें अद्यापि प्रचारांत आहेत हें खरें; तरी त्यांच्या प्रचारास उत्पलटीका विशेष कारणीभूत झाली असें ह्मटलें असतां चालेल. बृहत्संहिताटीकेंत नीराजनविधिविषयांत "यात्रायां व्याख्यातं" असें उत्पल म्हणतो. यावरून यात्राग्रंथावर उत्पलटीका होती असें दिसतें. लघुजातकावरही उत्पलव्याख्या आहे. बाकीच्या वराहाच्या ग्रंथांवर उत्पलटीका होती असें दिसत नाहीं. उत्पलटीकाकाल सुमारें शके ८८८ ह्मणजे वराहाच्या मागून सुमारें ४०० वर्षे आहे. उत्पलाच्यापूर्वींही बृहत्संहितेवर कांहीं टीका होत्या असें राहुचार टीकेंत व इतर २।३ स्थलीं 'अन्ये एवं व्याचक्षते' असें तो ह्मणतो त्यावरून दिसतें. बृहज्जातकावरील महीदास आणि महीधर यांच्या टीका डे. कालेजसंग्रहांत आहेत (नं. ३४१,३४३ सन १८८२।८३).

टीका.

याच्या बृहत्संहिता आणि बृहल्लघुजातक या ग्रंथांविषयीं जास्त विवेचन पुढें

शके ५५० मध्यें ब्रह्मसिद्धांत केला तेव्हां ब्रह्मगुप्त ३० वर्षांचा होता. यावरून त्याचें जन्म शके ५२० मध्यें झालें.

**स्थल.** ब्रह्मगुप्त हा भिनमाळ येथील राहणारा होता. हें गांव अबूपर्वत आणि लुणी नदी यांच्यामध्यें अबूच्या वायव्येस ४० मैलांवर गुजराथच्या उत्तरहद्दीवर दक्षिण मारवाडांत आहे. हल्लीं तें लहानसें खेडें आहे. पूर्वी त्याचें नांव भीलमाल किंवा श्रीमाल असें होतें. ती माघकवीची जन्मभूमि होय. हुएनसंग नांवाचा चिनी प्रवासी इ. स. च्या सातव्या शतकांत या देशांत आला होता त्या वेळीं ती उत्तर गुर्जर देशाची राजधानी होती. ब्रह्मगुप्तानें आपला सिद्धांत चाप वंशांतील व्याघ्रमुखराजाच्या वेळीं रचिला. व तो आपणास 'भिल्लमालकाचार्य' असें* म्हणवितो. चौडे अथवा चापोत्कट वंशांतले राजे इ. स. ७५६ पासून ९४१ पर्यंत अन्हिलवाड एथे राज्य करीत होते. व हल्लींही उत्तर गुजराथेंत लहान लहान संस्थानें त्यांजकडे आहेत. हा चावडे वंश व ब्रह्मगुप्तानें लिहिलेला चापवंश एकच असावा. हुएनसंगानें गुजराथची राजधानी भिलमाल असें ब्रह्मगुप्ताच्या कालाच्या सुमारासच लिहिलें आहे. व ब्रह्मगुप्त हा भिलमाळचा राहणारा अशी कथा अजून गुजराथी ज्योतिषांत आहे. यावरून ब्रह्मगुप्त हा भिनमाळ येथील राहणारा असावा.†

**ग्रंथ.** ब्राह्मस्फुटसिद्धांत आणि खंडखाद्यनामक करण हे याचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. खंडखाद्यांत आरंभवर्ष शके ५८७ हें आहे, यावरून आपल्या वयाच्या ६७ व्या वर्षी त्यानें तो ग्रंथ केला. ब्रह्मसिद्धांतांत तो म्हणतो —

गणितेन फलं सिद्धं ब्राह्मे ध्यानग्रहे यतोध्याये ॥ ध्यानग्रहो द्विसप्तत्यार्याणां न लिखितोत्र मया ॥'

अध्या. २४.

यावरून ध्यानग्रह नामक ७२ आर्यांचा एक अध्याय यानें केला होता आणि त्यांत फलें लिहिलेलीं होतीं असें दिसतें. तो अध्याय सिद्धांतांत लिहिला नाहीं असें तो ह्मणतो, आणि सांप्रत तो स्वतंत्रपणें उपलब्ध नाहीं. मग त्यांत जातकसंबंधें फलें होतीं कीं संहिताग्रंथांतल्यासारखीं होतीं हें नकळे. परंतु तो फार महत्वाचा आणि गुप्तरीतीनें शिष्यांस सांगण्यासारखा होता असा वरील आर्येंत त्याचा अभिप्राय दिसतो.

**उत्तर ब्राह्मसिद्धांत.** ब्रह्मोक्त ग्रहगणित फार काल लोटल्यामुळें खिल झालें ह्मणून तें स्फुट ( स्पष्ट ) सांगतों अशा अर्थाची याची एक आर्या पूर्वी दिली आहे ( पृ० १५२ ). शाकल्योक्त ब्रह्मसिद्धांत या नांवाचा ब्रह्मदेवानें नारदास सांगितलेला एक सिद्धांत प्रसिद्ध आहे. परंतु तो शके ७४३ च्या पूर्वी झाला नव्हता असें वर ( पृ० १८९ ) दाखविलेंच आहे. आणि ब्रह्मगुप्तानें दिलेलीं भगणादि मानें इत्यादि कोणत्याच गोष्टींत त्याचें ब्रम्हगुप्तसि-

---

* 'भिल्लमालकाचार्य' अशासारखी कांहीं संज्ञा खंडखाद्यटीकाकार वरुण ह्यानें त्यास दिली आहे, व ती कांहीं लेखी पुस्तकांत शेवटीं आढळते.

† Indian Antiquary, XVII. p. 192. July 1888.

[illegible] उद्देश आहे. यावरून पूर्व-[illegible] अधिक त्यानें पंचसिद्धांतिकेंत केलें असावें असें दिसतें. त्या-[illegible] संस्कार [illegible], कांहीं गोष्टी फार जास्त केल्या हें [illegible]. तथापि कुठें मोठा फेरफार त्यानें केला असेल असें सं-[illegible]. पंचसिद्धांतींतही त्या गोष्टी अनुभवास मिळतात असें त्यास वाटलें [illegible] अनुभवानें शुद्ध आहेत अशा त्यास दिसून आल्या [illegible] केलें असेल असें दिसतें. शिवाय देशांतर, छा-[illegible] कांहीं रीति त्याच्या स्वतःच्या असतील असें संभवतें.

यानें प्रथम करणग्रंथ केला. परंतु पुढें याचें लक्ष्य फलज्योतिषाकडे आणि विशेषतः नानाप्रकारचे सृष्टचमत्कार, पदार्थांचे गुणधर्म आणि त्यांचा व्यवहारांत उपयोग यांकडे फार लागलें असावें असें त्याच्या संहिताग्रंथावरून दिसतें. ब्रह्मगुप्तानें पूर्वज्योतिष्यांस दोष दिले आहेत, परंतु त्यांत वराहमिहिरास कोठें दोष दिला * नाहीं. भास्कराचार्यानें त्याची स्तुति केली आहे. आणि दुसऱ्या अनेक ग्रंथांत वराहमिहिराचीं वचनें आधारास घेतलीं आहेत. सृष्टिशास्त्राच्या ज्योतिःशास्त्र या एका शाखेवर ग्रंथ करणारे पुष्कळ झाले. परंतु त्याच्या अनेक शाखांवर विचार करणारा ज्योतिषी याच्यानंतर दुसरा कोणी झाला नाहीं असें म्हटलें असतां चालेल. आणि इतक्या प्राचीन काळीं असा मनुष्य आमच्या देशांत झाला हें मोठें भूषण आहे. परंतु त्याच्या जातकग्रंथाचा मात्र उपयोग पुढें आजपर्यंत पुष्कळ होत आला, तसा त्याच्या संहिताग्रंथाचा विचार व उपयोग फारसा कोणी केलेला दिसत नाहीं. त्यानें घालून दिलेल्या दिशेनें सृष्टपदार्थांच्या गुणधर्मांचा विचार तसाच पुढें अव्याहत चालता तर आज युरोपियनांनीं या कामांत आपणास मागें टाकिलें नसतें. परंतु ती परंपरा पुढें चालली नाहीं हें आमच्या देशाचें दुर्भाग्य होय.

## श्रीषेण आणि विष्णुचंद्र.

वराहाच्या नंतर आणि ब्रह्मगुप्ताच्या पूर्वी म्हणजे शके ४२७ आणि ५५० यांच्यामध्यें केव्हां तरी हे ज्योतिषी झाले. ह्यांचे ग्रंथ सांप्रत उपलब्ध नाहींत. सांप्रतचे रोमक आणि वासिष्ठ हे सिद्धांत यांचेच किंवा यांच्या ग्रंथांच्या आधारानें रचलेले असतील इत्यादि विचार पूर्वी केलाच आहे.

## ब्रह्मगुप्त.

काल. हा आपल्या ब्राह्म स्फुटसिद्धांतांत ह्मणतो:—

श्रीचापवंशतिलके श्रीव्याघ्रमुखे नृपे शकनृपाणां ॥ पंचाशत्संयुक्तैर्वर्षशतैः पंचभिरतीतैः ५५० ॥ ७ ॥
ब्राह्मः स्फुटसिद्धांतः सज्जनगणितगोलवित्प्रीत्यै ॥ त्रिंशद्वर्षेण कृतो जिष्णुसुतब्रह्मगुप्तेन ॥ ८ ॥

यावरून चापवंशांतील व्याघ्रमुख नामक राजा राज्य करित असतां, ब्रह्मगुप्तानें शक ५५० मध्यें हा ग्रंथ केला. ब्रह्मगुप्ताच्या पित्याचें नांव जिष्णु असें होतें.

---

* ग्रहणाचें कारण [illegible] राहु असें वराहमिहिर म्हणत नाहीं याबद्दल मात्र ब्रह्मगुप्तानें त्यास दोष दिला आहे, परंतु तो वास्तविक दोष नव्हे. आणि ब्रह्मगुप्ताचाही खरा उद्देश दोष देण्याचा नाहीं.

दोन्ही सूर्यसिद्धांत यांतील मानांनीं कलियुगारंभीं सर्व मध्यमग्रह एकत्र येतात परंतु या ब्रह्मसिद्धांतानें तसे येत नाहींत. सांप्रतच्या सूर्यसिद्धांतांत कल्पारंभानंतर कांहीं वर्षे सृष्ट्युत्पत्तीकडे गेलीं असें मानलें आहे तसेंही यांत नाहीं. यांत कल्पारंभ तोच ग्रहचारारंभ आहे.

वरील मानांसंबंधें प्रथम विचार करण्यासारखी गोष्ट ही कीं यांतील वर्षाचें मान ३६५।१५।३०।२२।३० हें पंचसिद्धांतिकोक्त पुलिश आणि रोमक यांखेरीज भारतवर्षीय कोणत्याही सिद्धांतापेक्षां कमी आहे. पंचसिद्धांतिकोक्त पुलिश आणि रोमक हे ब्रह्मगुप्ताच्या वेळीं प्रचारांत नव्हते हें प्राचीन आणि वर्तमान सिद्धांतपंचकांच्या विवेचनांत स्पष्ट झालेंच आहे. प्रथमार्यसिद्धांत आणि मूलसूर्यसिद्धांत हे त्याच्या वेळीं चालत होते. त्यांतील मूलसूर्यसिद्धांतापेक्षां ब्रह्मसिद्धांताचें वर्ष ६७$\frac{१}{२}$ विपळें कमी आणि प्रथमार्यसिद्धांतापक्षां ५२$\frac{२}{३}$ विपळें कमी आहे. हें अंतर थोडें दिसतें. परंतु यामुळें ब्रह्मसिद्धांताची मेषसंक्रांत शके ५४० मध्य प्रथमार्यसिद्धांताच्या मेषसंक्रमणापूर्वीं ५४ घ. १४$\frac{१}{८}$ पळें आणि मूलसूर्यसिद्धांताच्या पूर्वीं ५४ घ. ४३$\frac{७}{८}$ पळें झालीं. असें होण्याचें कारण काय ? याचें कारण मला एकच दिसतें. आणि तें हें कीं, ज्या दिवशीं दिनरात्रिमान सारखें होतें त्या विषुवदिवशीं ह्मणजे ज्या दिवशीं क्षितिजाच्या बरोबर पूर्वबिंदूंत सूर्य उगवतो त्या दिवशीं त्यानें मेषसंक्रमण मानलें. असें मेषसंक्रमण ह्मटलें ह्मणजे तें सायनरवीचें होय. ब्रह्मगुप्तानें प्रत्यक्ष वेध ज्या कालीं घेतले असतील त्या कालच्या सुमारास सायनस्पष्टरवीचें मेषसंक्रमण ज्या वेळीं होतें त्याच वेळेच्या सुमारास ब्रह्मसिद्धांताचें होतें. शके ५०९ मध्यें ब्रह्मसिद्धांताप्रमाणें स्पष्ट मेषसंक्रमण चैत्र शु० ३ भौमवार ता० १८ मार्च सन ५८७ या दिवशीं उज्जयिनी मध्यमसूर्योदयापासून ५६ घ. ४० पळें या वेळीं येतें. आणि त्या *वर्षीं सायनस्पष्टरवीचें मेषसंक्रमण (रवि ०।०।० ) त्याच दिवशीं त्याच वेळीं येतें. ब्रह्मगुप्ताचें जन्म शके ५२० मध्यें झालें. त्यानें वेध घेण्यास आरंभ शके ५४० च्या सुमारें केला असेल. म्हणून शके ५४० चें गणित करून पाहतां त्या वर्षीं ब्रह्मसिद्धांताप्रमाणें स्पष्टमेषसंक्रमण चैत्र कृ. १ शनिवार घ. ५७ प. २२ या वेळीं येतें. आणि त्या वेळीं सायनस्पष्टरवि० रा० अं. ३० कला येतो. म्हणजे ब्रह्मसिद्धांताच्या मेषसंक्रमणापूर्वीं सुमारें ३० घटिका सायनमेषसंक्रमण झालें. परंतु मेषसंक्रमणकालीं ३० घटिकांत सूर्याची क्रांति सुमारें १२ कला मात्र वाढते, यामुळें श. ५४० मध्यें ब्रह्मसिद्धांतमेषसंक्रमणकालीं सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेस १२ कला मात्र असला पाहिजे. आणि त्या दिवशीं सूर्योदयींच ब्रह्मसिद्धांताचें मेषसंक्रमण झालें असतें तर त्या वेळीं पूर्वबिंदूच्या उत्तरेस १२ कला सूर्यमध्यबिंदु दिसला असता. परंतु सूर्योदयींच मेषसंक्रमण नेहमीं होतें असें नाहीं. ही गोष्ट, दिक्साधन करण्यामध्यें कांहीं कलांची चुकी होण्याचा संभव, आणि वेधाचीं साधनें स्थूल, इतक्या गोष्टी मनांत आणिल्या असतां, यांचा ज्याला अनुभव आहे त्याच्या लक्ष्यांत सहज येईल कीं १२ कलांची चुकी होण्याचा संभव आहे. आणि यावरून मला निश्चयानें

---

* सायनरवीचें गणित केरोपंती ग्र. सा. को. वरून केलें आहे. तें पुस्तक फार सूक्ष्म नसल्यामुळें सदहू गोष्ट कदाचित् एक वर्ष मागें पुढें येईल. तसेंच वरील गणितांत रवीस कालांतर संस्कार दिला नाहीं. तो त्या सुमारास सुमारें २ कला आहे. यामुळेंही १।२ वर्षांचा फेर पडेल.

ब्रह्मसिद्धांताशीं कांहीं संबंध नाहीं असें स्पष्ट दिसतें. विष्णुधर्मोत्तर* नामक एक पुराण आहे. त्यांत एक ब्रह्मसिद्धांत आहे. भट्टोत्पलानें बृहत्संहितेच्या टीकेंत ब्रह्मसिद्धांतांतल्या पुष्कळ आर्या घेतल्या आहेत. त्यांतील कांहीं ठिकाणीं " ब्रह्मसिद्धांत " असेंच म्हटलें आहे. कोठें " तथा च ब्रह्मगुप्तः " असें म्हटलें आहे, शाकल्योक्त ब्रह्मसिद्धांत किंवा विष्णुधर्मोत्तरपुराणांतर्गत ब्रह्मसिद्धांत यांचा उल्लेख उत्पलानें कोठें केला नाहीं. यावरून ते दोन सिद्धांत उत्पलाच्या वेळीं असल्यास फारसे प्रसिद्ध नव्हते. निदान उत्पलाचें मत तरी ब्रह्मसिद्धांत म्हणजे ब्रह्मगुप्ताचा असें होतें. ब्रह्मगुप्तानेंही आपल्या सिद्धांतास सर्वत्र " ब्राह्मस्फुटसिद्धांत " किंवा " ब्रह्मसिद्धांत " म्हटलें आहे. मींही सोईसाठीं या ब्रह्मगुप्ताच्या सिद्धांतास पुढें ' ब्रह्मसिद्धांत ' म्हटलें आहे.

भगणादि मानें. ब्रह्मसिद्धांतांतील भगणादि मानें खालीं दिलीं आहेत.

| कल्प म्हणजे ४३२०००००००० वर्षें इतक्या कालांत. | | | | |
|---|---|---|---|---|
| | सावनदिवसादि मानें. | भोगभगण. | मंदोच्च-भगण. | पातभगण. |
| नक्षत्रभ्रम | १५८२२३६४५०००० | | | |
| रवि | | ४३२००००००० | ४८० | |
| सावन दिवस | १५७७९१६४५०००० | | | |
| चंद्र | | ५७७५३३००००० | | |
| चंद्रोच्च | | ४८८१०५८५८ | | |
| राहु | | २३२३११६८ | | |
| मंगळ | | २२९६८२८५२२ | २९२ | २६७ |
| बुध | | १७९३६९९८९८४ | ३३२ | ५२१ |
| गुरु | | ३६४२२६४५५ | ८५५ | ६३ |
| शुक्र | | ७०२२३८९४९२ | ६५३ | ८९३ |
| शनि | | १४६५६७२९८ | ४१ | ५८४ |
| सौरमास | ५१८४०००००००० | | | |
| अधिमास | १५९३३०००००० | | | |
| चांद्रमास | ५३४३३३००००० | | | |
| तिथि | १६०२९९९०००००० | | | |
| क्षयाह | २५०८२५५०००० | | | |

| | दि. | घ. | प. | विपळें. | प्रतिविपळें. |
|---|---|---|---|---|---|
| वर्षमान | ३६५ | १५ | ३० | २२ | ३० |

वरील सर्व मानें कल्पांतील आहेत. ग्रहभगणांच्या सर्व संख्या कोणत्याही एका संख्येनें विभाज्य नाहींत, यामुळें या ब्रह्मसिद्धांताप्रमाणें कल्पारंभाखेरीज मध्यें कोणत्याही वेळीं सर्व मध्यमग्रह एका स्थळीं येत नाहींत. प्रथमार्यसिद्धांत व

* याचा पुढें [illegible] वर्णन आहे.

पंचांग सायनमानाचें असावें कीं निरयनमानाचें असावें याबद्दल सांप्रत वाद आहे. त्यांत सायन गणनेस अनुकूल अशी गोष्ट वरील विचारावरून दिसून येते कीं ब्रह्मगुप्ताचें मूळ मत सायनरविसंक्रमण तेंच वास्तविक संक्रमण असें होतें. आणि त्याप्रमाणें वर्षमानही बदलावें असा त्याचा उद्देश होता व त्याप्रमाणें त्यानें बदललें. आपले सर्व आयुष्यांत वेध घेऊन त्यांची तो तुलना करिता तर सायनवर्षाचें खरें मान त्याच्यासारख्या शोधकास समजणें अशक्य नव्हतें. कदाचित् तें मान त्यास समजलें असलें तरी परंपरागत वर्षमान सोडण्याचें धैर्य त्यास झालें नसेल. त्याचें वर्षमान इतरांहून कमी आहे याचें जें कारण मीं काढलें आहे तें मी सायनमताचा अभिमानी ह्मणून काढिलें असें नाहीं. निरयनमताच्या पूर्ण अभिमान्यासही तें कबूल केलें पाहिजे.

सायन.

ब्रह्मसिद्धांतांतील ग्रहभगणसंख्या वर दिल्या आहेत त्या इतर सिद्धांतांहून थोडथोड्या भिन्न आहेत. तथापि शके ४२१ मध्यें ब्रह्मसिद्धांतावरून निघणाऱ्या मध्यमग्रहांची आधुनिक युरोपियन ग्रंथांवरून निघणाऱ्या ग्रहांशीं तुलना पूर्वी केली आहे (पृ० २००), तींत दोहोंमध्यें फार अंतर नाहीं. यावरून स्वकालीं ग्रह वेधास मिळतील अशा भगणसंख्या ब्रह्मगुप्तानें कल्पिल्या असें दिसतें. मंदोच्चें आणि पात यांची तुलना वर केली आहे (पृ. २०५) तीवरून त्याबद्दलचाही त्याचा स्वतंत्र शोध दिसून येतो. तेव्हां वर्षमान, ग्रहभगणसंख्या, उच्चपातभगणसंख्या, यांवरून ब्रह्मगुप्त हा स्वतः वेध घेऊन स्वतंत्रपणें शोध करणारा होता असें स्पष्ट दिसून येतें. आणि ज्योतिःशास्त्रांत हीच मुख्य महत्वाची गोष्ट आहे. अशा पुरुषाच्या अंगीं जें तेज व जो योग्य स्वाभिमान असावा तो त्याच्या ग्रंथांत जागोजाग व्यक्त झाला आहे. स्पष्टाधिकारांत तो ह्मणतोः

ग्रहशुद्धि. वेध.

ब्रह्मोक्तमध्यरविशशितदुच्चतत्परिधिभिः स्फुटीकरणं
कृत्वैवं स्पष्टतिथिर्दूरभ्रष्टान्यतंत्रोक्तैः ॥ ३१ ॥

अ. २.

यांत अन्यतंत्रांची तिथि दूरभ्रष्ट झाली, ब्राह्मावरून आलेले रविशशि आणि त्यांवरून आलेलीच तिथि शुद्ध होय, असें तो ह्मणतो.

आर्यभटस्याज्ञानान्मध्यममंदोच्चशीघ्रपरिधीनां ॥
न स्पष्टा भौमाद्याः स्पष्टा ब्रह्मोक्तमध्याद्यैः ॥ ३३ ॥

अ. २.

यांत ब्रह्मसिद्धांताचे मध्यमग्रह, मंदोच्चें, शीघ्रपरिधि, यांवरून मात्र भौमादि स्पष्ट येतात, आर्यभटाचे चुकतात, असें तो ह्मणतो. अशीं दुसरींही वरीच उदाहरणें आहेत. हा अभिमान किंचित् जास्त होऊन कांहीं स्थलीं तो दुरभिमान झाला आहे असें ह्मटल्यावांचून मात्र राहवत नाहीं. दूषणाध्याय म्हणून ६३ आर्यांचा एक स्वतंत्र अध्याय ( ११ वा ) त्यानें आपल्या सिद्धांतांत दिला आहे. त्यांतील आर्यभटास दिलेलीं कांहीं दूषणें केवळ दुराग्रहाचीं आहेत.

उपोद्घातांत सांगितलेले बहुतेक सिद्धांतांत असणारे जे अधिकार ते यानें आपल्या सिद्धांतांत आरंभीं १० अध्यायांत दिले आहेत. परंतु त्यानें पुढें जास्त चवदा अध्यायांत पुष्कळ जास्त विषय

ब्राह्मसिद्धांतविषय.

सिद्धांतप्रमाणें किंवा आर्यभटसिद्धांतप्रमाणें सूर्योदयीं न मानतां मूलसूर्यसिद्धांताप्रमाणें अर्धरात्रीं मानावी लागली. खंडखाद्यांत आरंभवर्ष शके ५८७ आहे, आणि त्या वर्षी स्पष्टमानानें अमांत वैशाख शुक्ल प्रतिपदा तिथि रविवारीं येते. त्या रविवारच्या पूर्व मध्यरात्रीचे ह्मणजे अमांत चैत्र कृष्ण ३० शनिवार मध्यरात्रीचे क्षेपक दिले आहेत. आणि तेव्हांपासून अहर्गण साधला आहे. मध्यममेषसंक्रमण मूलसूर्यसिद्धांतप्रमाणें त्याच शनिवारीं घ. १२ प. ९ यावेळीं येतें.* क्षेपक दिले आहेत ते असेः—

| | रा. | अं. | क | वि. | | रा. | अं. | क. | वि. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सूर्य | ० | ० | ३२ | २२ | बुध | ९ | ० | ४४ | ४९ |
| चंद्र | ० | ९ | ९ | ४३ | गुरु | ६ | ४ | २५ | १६ |
| चंद्रोच्च | १० | ८ | २८ | ९ | शुक्र | १० | ० | १९ | १४ |
| राहु | ० | १८ | ४७ | २३ | शनि | ९ | ६ | ४१ | १६ |
| मंगळ | ३ | १० | १३ | ६ | | | | | |

मूलसूर्यसिद्धांताचीं भगणादिमानें पूर्वीं दिलीं आहेत (पृ. १६६), त्यांवरून शके ५८७ चैत्र कृष्ण ३० शनिवार मध्यरात्रीचे ग्रह काढले तर चंद्रोच्च आणि राहु-खेरीज करून वरील क्षेपकांशीं अगदीं बरोबर मिळतात. आर्यभटसिद्धांतावरून काढलेल्या ग्रहांशीं मिळत नाहींत. यावरून वर्षमान, अहर्गणारंभ आणि बहुतेक क्षेपक या सर्व गोष्टींनीं खंडखाद्यकरण मूलसूर्यसिद्धांताशीं मिळतें. मूलसूर्यसिद्धांतांतले राहुभगण समजले नाहींत. चंद्रोच्च मूलसूर्यसिद्धांताशीं मिळत नाहीं, परंतु आर्यभटसिद्धांताशीं किंवा ब्रह्मसिद्धांताशींही मिळत नाहीं. राहु शेवटल्या दोहोंपैकीं कोणाशींही मिळत नाहीं. ब्रह्मसिद्धांताचें वर्षमान आणि वर्षारंभ ह्यांहून खंडखाद्यांत वर्षमान आणि वर्षारंभ भिन्न स्वीकारल्यामुळें ब्रह्मसिद्धांतांतील चंद्रोच्च आणि राहु खंडखाद्यांत घेऊन उपयोग नव्हता हें उघड आहे. खंडखाद्य आर्यभटसिद्धांताशीं सर्वांशीं मिळत नाहीं हें खरें आहे, तरी आर्यभटीयांतील कांहीं मानें मूलसूर्यसिद्धांतावरोबर असल्यामुळें शके ५८७ मध्यें खंडखाद्यावरून येणारी ग्रहमध्यमस्थिति आर्यभटसिद्धांताशीं फारच मिळती निघत होती.

खंडखाद्याच्या उत्तरार्धांत ब्रह्मगुप्त प्रथमच म्हणतो कीं, आर्यभटाचें ग्रहस्पष्टीकरण स्फुट (दृक्प्रत्ययद) नाहीं म्हणून तें सांगतों. त्याजवर टीकाकार वरुण म्हणतो कीं, ‘आर्यभटतुल्य ग्रंथ करितों असें ब्रह्मगुप्तानें म्हटलें त्याप्रमाणें पूर्वार्धांत केलें. उत्तरार्धांत दृक्प्रत्यय येईल असा फलसंस्कार आपल्या सिद्धांतावरून सांगितला आहे. त्यांत जें सांगितलें नाहीं तें आर्यभटकरणावरून घ्यावें.’ यावरून आणि उत्तरार्धांतील इतर प्रकरणांवरून दिसतें कीं दृक्प्रत्यय येण्याजोगा फेरफार मात्र त्यानें खंडखाद्यांत केला आहे. वर्षमान, ग्रहमध्यमगति, क्षेपक, युगारंभवेला, ह्या महत्वाच्या गोष्टी आर्यभटाच्या ग्रंथांतून घेतल्या आहेत. हा आर्यभटाचा ग्रंथ त्याचा सिद्धांत हल्लीं उपलब्ध आहे तो नव्हे, तर आर्यभटाचा करणग्रंथ होय असें वरुणाचा वरील उल्लेख इत्यादिकांवरून दिसतें.

स्वतःच्या सिद्धांताशीं तुल्य असें करण करण्याचें सोडून, ज्या आर्यभटावर यानें दूषणांची वृष्टि केली आहे, ज्याचा हा पूर्ण प्रतिस्पर्धी, त्याच्या ग्रंथासारखा ग्रंथ

* पंचसिद्धांतिकेंतही अमावास्येच्या सुमारास मध्यममेषसंक्रमण हीच सोय साधली आहे, हें वराहमिहिरवर्णनांत सांगितलेंच आहे. इतर गोष्टींतही दोहोंत पुष्कळ साम्य आहे.

त्यानें कालावर भिस्त न ठेवितां आपली कृति आपणच सोडून दिली हें त्यास किंचित् लांछनच होय. परंतु अशा महान् विद्वानाच्या उत्तम कृतीनें विद्वानांचा परितोष होणार नाहीं असें कसें होईल? त्याच्याचसारखा महान् ज्योतिषी जो भास्कराचार्य यानें तर त्याचाच आगम स्वीकारला आहे. भास्कराचार्याच्या पूर्वीचेही दोन करणग्रंथ ब्रह्मसिद्धांतानुयायी आढळतात. या सर्वांत ब्रह्मसिद्धांतावरून येणाऱ्या ग्रहांस एक बीजसंस्कार मात्र कल्पिला आहे. शके ९६४ मध्यें झालेल्या राजमृगांककरणांत हा संस्कार प्रथम आढळतो. परंतु त्यापूर्वीं या बीजसंस्कारावांचून केवळ निजरूपानें ब्रह्मसिद्धांत प्रचारांत होता याचें एक उदाहरण मला आढळलें आहे.

निजरूप. सन १८८३।८४ च्या पुणें कालेजसंग्रहांत गुणभद्रकृत उत्तरपुराण ह्मणून एक जैनग्रंथ सांपडला आहे ( नं. २८९ ). त्यांत त्याचा रचनाकाल असा सांगितला आहे:

> शकनृपकालाभ्यंतरविंशत्यधिकाष्टशत ८२० मिताब्दान्ते ॥
> मंगलमहार्थकारिणि पिंगलनामनि समस्तजनसुखदे ॥ ३५ ॥
> श्रीपंचम्यां बुधार्द्रायुजि दिवसवरे मंत्रिवारे सुधांशौ
> पूर्वायां सिंहलग्ने धनुषि धरणिजे वृश्चिकार्कौ, तुलागौ ॥
> सूर्ये शुक्रे कुलीरे गवि च सुरगुरौ

या श्लोकांवरून त्या वेळची ग्रहस्थिति अशी होती:—

| | |
|---|---|
| सूर्य–कुलीर ( कर्क ) राशीस | गुरु–गवि ( वृषभीं ) |
| चंद्र–पूर्वा [ भाद्रपदां ] मध्यें | शुक्र–कुलीर ( कर्क ) राशीस |
| मंगळ–धनुराशीचा | शनि ( आर्कि )–वृश्चिक राशिस |
| बुध–आर्द्रानक्षत्रीं | राहु ( अगु )– तुला राशीस |

शके ८१९ गत या वर्षी पिंगल संवत्सर येतो. ८१९ गत ह्मणजे ८२० वर्तमान. यांत गणितास ८१९ घ्यावे कीं ८२० ही प्रथम शंका येते. तसेंच श्लोकांत मासपक्ष नाहीं, तिथि मात्र आहे. वार मंत्रिवार आहे. तो बहुधा गुरुवार किंवा कदाचित् शुक्रवारही असेल असें मनांत येतें. परंतु श्लोकांत सर्व ग्रहांची स्थिति आहे यामुळें ती सर्व स्थिति मिळेल तो दिवस खरा हें उत्कृष्ट साधन आहे. शके ८१९ आणि ८२० या दोन वर्षांतील अनेक दिवसांचें गणित करून पाहतां शके ८१९ ( गत ) अमान्त आषाढ कृष्ण ५ गुरुवार ता. २३ जून सन ८९७ या दिवशीं सूर्योदयापासून सुमारें २४ घटींपर्यंत अशी स्थिति होती. श्लोकांत सिंहलग्न आहे तें सूर्योदयापासून सुमारें ४ पासून ९ घटींपर्यंत होतें. दोन वर्षांत या दिवसावांचून दुसऱ्या कोणत्याही दिवशीं ही स्थिति संभवतच नाहीं. यांत चंद्राची स्थिति आहे ती एक दिवसही पुढें किंवा मागें घेऊन जमत नाहीं. हें एथे सांगण्याचें कारण इतकेंच कीं, यांतील ग्रहस्थिति ब्रह्मसिद्धांताप्रमाणें ब्रह्मगुप्तानें दिलेलें वर्षमान घेऊन मात्र जमते. इतर कोणत्याही सिद्धांताप्रमाणें जमत नाहीं. सूर्यसिद्धांताप्रमाणें आषाढ कृ. ५ गुरुवारीं सूर्य मिथुनराशीचा येतो. शुक्रवारीं सूर्योदयानंतर सुमारें ५ घटिकांनीं कर्कराशीचा होतो. दुसऱ्या कोणत्याच सिद्धांतानें गुरुवारीं कर्कींचा येत नाहीं. त्या शकांत ब्रह्मसिद्धांताची कोणतीही संक्रांति सांप्रतच्या सूर्यसिद्धांताच्या संक्रांतीपेक्षां ६१ घटी ३१ पळें पूर्वी होते. तसेंच मंगळही सांप्रतच्या सूर्यसिद्धांताप्रमाणें गुरुवारीं मकरराशी-

[illegible] व [illegible] निर्दिष्ट आहे, हें आश्चर्य आहे. याचीं [illegible], [illegible] खंडखाद्य ग्रंथ जसा लोकमान्य झाला अ-[illegible] दिसत नाहीं. [illegible] स्वतःच्या सिद्धांताची संक्रांति [illegible] मूलसूर्यसिद्धांताच्यापूर्वी ५५ घ. ३६ पळें [illegible] ५७ घ. ५४ प. येत होती. इतका फरक असल्यामुळें [illegible] भिन्न येत. अधिकमास भिन्न आणि संक्रांति एक दि-वस पुढें [illegible] समजणारी, यामुळें स्वतःच्या सिद्धां-[illegible] लोकमताची प्रतिकूलता. या दोन्ही कारणांनीं स्वतःच्या [illegible] करण्यास त्यास धैर्य झालें नाहीं असें दिसतें. संक्रां-[illegible] दिवसांहून जास्त फरक असतां ब्रह्मगुप्तास आपलें मत प्रचारांत आण-[illegible], मग सांप्रत केरोपंती पंचांगाची संक्रांति जुन्या पंचांगाहून सुमारें ४ दि-वस पुढें येते आणि सायनपंचांगाची २२ दिवस पूर्वी होते, तर अशीं पंचांगें प्रवृत्तींत [illegible] कठिण आहे ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे.

खंडखाद्यावर वरुण आणि भट्टोत्पल यांच्या टीका आहेत. पृथूदकाची टीका असावी असें दिसतें. परंतु ती कोठें आढळली नाहीं. आ-[illegible] एक खंडित टीका आहे; तींत टीकाकाराचें नांव नाहीं; परंतु उदाहरणार्थ शक १५६४ घेतला आहे, चर देशांतर इत्यादि संस्कार काश्मीर-देशाच्या संबंधें आहेत, यावरून तो टीकाकार काश्मीर देशांतला आहे हें स्पष्ट आहे. पंचांगकौतुक म्हणून एक ग्रंथ डेक्कन कॉलेज संग्रहांत आहे. (नं. ५३७ सन १८७५।७६ ). त्यांत पंचांगसाधन फार सुलभ रीतीनें होण्यासारख्या सारण्या व रीति आहेत. त्यांत आरंभवर्ष शके १५८० आहे आणि सर्व गणित खंड-खाद्याच्या आधारें केलें आहे. हा ग्रंथ काश्मीरांत आला असें कोठें त्यांत आढ-ळत नाहीं. तथापि तें पुस्तक काश्मीरांत सांपडलेलें आहे आणि त्यांत काश्मीरांत चालणाऱ्या लौकिककालाचा उपयोग केला आहे. यावरून तो ग्रंथकार काश्मी-रांतला असावा असें स्पष्ट दिसतें. यावरून शके १५८० पर्यंत खंडखाद्यकरण काश्मीरांत प्रचारांत असावें हें निःसंशय आहे. आणि अद्यापिही तिकडे तें प्रचारांत असेल असें खंडखाद्याच्या वर लिहिलेल्या तिन्ही टीकांचीं पुस्तकें आणि पंचांग-कौतुक यांच्या पुणें कॉलेजसंग्रहांतल्या प्रती काश्मीरांत सांपडल्या यावरू-न वाटतें. भास्कराचार्यानें खंडखाद्याचा उल्लेख केला आहे. अलबिरूणीस ( शके ९५० ) खंडखाद्यग्रंथ मिळाला होता. त्यानें त्यांतले कांहीं उतारे दिले आहेत.

ब्रह्मगुप्तानें आपल्या सिद्धांताहून निराळा खंडखाद्यग्रंथ केला यावरून आपल्या सिद्धांताचे अनुयायी कोणी होतील असा भरंवसा त्यास आला नसावा.

[illegible] न साधु मन्ये… विजानं ॥

या कालिदासोक्तीप्रमाणें असें होणें साहजिक आहे. आपल्या वयाच्या ६७ व्या वर्षीं त्यानें खंडखाद्य रचिलें. तोंपर्यंत त्याचा सिद्धांत प्रत्यक्ष प्रचारांत आला नसेल. आणि [illegible] वर्षें जाईपर्यंतही आपले अनुयायी कोणी होत नाहींत असें पाहून शेवटीं निराश होऊन त्यानें खंडखाद्य रचिलें असावें. आपल्या कृतीचें सार्थ-क्य आपल्या डोळ्यांदेखत पाहणें इतकें भाग्य महान् शोधकांपैकीं थोड्यांचेंच असतें.

शल्य दिसून येतें. वेधादिकांचीं यंत्रें यानें वर्णिलीं आहेत, त्यांतलें तुरीययंत्र यानें नवीन कल्पिलें असें माझें मत आहे. बीजगणित याच्या पूर्वींच्या ग्रंथांत कोठें आढळत नाहीं. यावरून त्याचा उत्पादक कदाचित् हाच असेल. सिद्धांतसुंदर-ग्रंथाचा कर्ता ज्ञानराज याचा पुत्र सूर्यदास ह्यानें भास्कराचार्याच्या बीजावर टीका शके १४६० मध्यें केली आहे. आर्यभट हा सर्वांत प्राचीन बीजगणितकार असें तो मानतो. पहिल्या आर्यभटाच्या ग्रंथांत बीजगणित नाहीं म्हटलें तरी चालेल. दुसऱ्या आर्यभटग्रंथांत आहे. परंतु तो ब्रह्मगुप्ताहून अर्वाचीन आहे असें पुढें दाखविण्यांत येईल. तेव्हां प्रस्तुत उपलब्ध असलेल्या माहितीवरून पाहतां पहिला बीजगणितकार ब्रह्मगुप्तच होय. त्यानें बीजगणिताध्यायांत तो विषय नवीन मीं काढिला अशा प्रकारचे अभिमानाचे कांहींच उद्गार काढले नाहींत. यावरून त्याच्या पूर्वींही तो विषय असावा असें अनुमान होतें. तथापि ग्रंथ उपलब्ध नाहींत. एकंदरींत पाहतां ब्रह्मगुप्त हा महाकल्पक आणि शोधक होय. भास्कराचार्यासारख्यानें त्यास " कृती जयति जिष्णुजो गणचक्रचूडामणिः " असें म्हटलें आहे. तसेंच दुसरे एके स्थलीं " यदा पुनर्महताकालेन महदंतरं भविष्यति तदा महामतिमंतो ब्रह्मगुप्तसमानधर्मिण एवोत्पत्स्यंते ते तदुपलब्ध्यनुसारिणीं गतिमुररीकृत्य शास्त्राणि करिष्यंति " यांत स्वतःच्या शोधानें नवीन गतिस्थिति कल्पिणारा महामतिमान् शास्त्रकार असें त्यास ह्मटलें आहे तें योग्य आहे.

## लल्ल ( सुमारें शक ५६० ).

ग्रंथ. त्याचा धीवृद्धिदतंत्र या नांवाचा ग्रहगणितग्रंथ आहे. तो काशी एथे सुधाकर द्विवेदी यांणीं इ० स० १८८६ मध्यें शोधून छापिला आहे. रत्नकोश नांवाचा याचा एक मुहूर्तग्रंथ आहे.

काल. लल्लानें आपला काल किंवा स्थल सांगितलें नाहीं. धीवृद्धिदतंत्रांत मध्यमाधिकारांत तो ह्मणतोः—

> विज्ञाय शास्त्रमलमार्यभटप्रणीतं । तंत्राणि यद्यपि कृतानि तदीयशिष्यैः ॥
> कर्मक्रमो न खलु सम्यगुदीरितस्तैः । कर्म ब्रवीम्यहमतः क्रमशस्तु सूक्तं ॥ २ ॥

उत्तराधिकारांत आर्यसिद्धांतावरून येणाऱ्या ग्रहांस बीजसंस्कार सांगितला आहे, तो असाः

> शाके नखाब्धि ४२० रहिते शशिनोक्षदस्रै २५ स्तत्तुंगतः कृतशिवै ११४ स्तमसः षडंकैः ९६॥
> शैलाब्धिभिः ४७ सुरगुरोर्गुणिते सितोच्चात् शोध्यं त्रिपंचकु १५२ हतेभ्रशराक्षि २५० भक्ते ॥ १८ ॥
> रत्नेरमांबुधि ४८ हते क्षितिनंदनस्य सूर्यात्मजस्य गुणितेंबरलोचनै २० श्च ॥
> व्योमाक्षिवेद ४२० निहते विदधीत लब्धं शीतांशुसूनुचलतुंगकलासुवृद्धिं ॥ १९ ॥
> इति...ग्रहकर्म दृक्समभावात् ॥ २० ॥ आसीदशेषबुधवंदितपादपद्मः ...... ॥
> शाम्बस्ततोजनि जनेक्षगकैरवेंदुर्भट्टत्रिविक्रम इति प्रथितः पृथिव्यां ॥ २१ ॥
> लल्लेन तस्य तनयेन शशांकमौलेः शैलाधिराजतनयादयितस्य शंभोः ॥
> संपूज्य पादयुगमार्यभटाभिधानसिद्धांततुल्यफलमेतदकारि तंत्रं ॥ २२ ॥

लल्लाच्या ग्रंथांतील भगणादि मानें सर्व पहिल्या आर्यभटाच्या ग्रंथाशीं मिळतात. त्यांत लल्लानें वरील १८।१९ श्लोकांतला बीजसंस्कार मात्र दिला आहे. यावरून तो

[illegible], ब्रह्मसिद्धांतावरची चतुर्वेदाचार्याची टीका. एकंदरींत इतकेंच सांगावयाचें कीं [illegible] सांप्रतचें अस्तित्व मिळतें. आणि त्याविषयीं अनेक गोष्टी वि-[illegible], कांहीं संशय राहत* नाहीं. यावरून शके ८१९ मध्यें ब्रह्मसिद्धांत [illegible] असें निःसंशय सिद्ध होतें. हें पुराण अकालवर्षनामक राष्ट्रकूटांतील राजा दक्षिणेंत राज्य करीत असतां त्याच्या कारकीर्दीत दक्षिणेंतच [illegible] आहे. यावरून शके ८१९ मध्यें दक्षिणेंत ब्रह्मसिद्धांत निजरूपानें चालत होता. यावरून त्यास बीजसंस्कार कल्पिला. तो त्यानंतर कोणी कल्पिला असावा.

चतुर्वेदाची ब्रह्मसिद्धांतावरील टीका शके ९६२ च्या सुमाराची आहे. तींत बीजाविषयीं कांहीं उल्लेख नाहीं. राजमृगांककरणग्रंथ शके ९६४ मध्यें झाला, त्यांत तो संस्कार आहे. त्याच वेळीं तो कल्पिला

बीज.

असें मला वाटतें. त्या संस्कारांत सूर्यमध्यें बीजसंस्कार आहे. यामुळें ब्रह्मसिद्धांताचें [illegible] वर्ष ३६५।१५।३०।२२।३० होतें तें संस्कारानें सुमारें ३६५।१५।३१।१७ इतकें झालें आहे. म्हणजे प्रथमार्यसिद्धांतवर्षाहून सुमारें २ विपळें जास्त झालें. यापुढील [illegible] जे ग्रंथ आढळतात ते बीजसंस्कृतब्रह्मसिद्धांततुल्यच आहेत. अशा करणग्रंथांत पहिला शके ९६४ मधील राजमृगांक होय. दुसरा शके ९८० या वर्षीचा करणकमलमार्तंड हा होय. यानंतरचा भास्कराचार्यांचा शके ११०५ मधील करणकुतूहल हा आहे. महादेवीसारणी या नांवाचा शके १२३८ मधील ग्रहसाधनाचा ग्रंथ, दिनकर नामक ज्योतिष्याचे खेटकसिद्धि आणि चंद्रार्की हे शके १५०० या वर्षीचे दोन ग्रंथ, हेही बीजसंस्कृतब्रह्मसिद्धांततुल्य आहेत. यांतील करणकुतूहल तर अद्यापिही कोठें कोठें प्रचारांत आहे. ग्रहलाघवकर्त्यानें कांहीं ग्रह ब्रह्मपक्षाचे म्हणून घेतले आहेत, ते करणकुतूहल ग्रंथांतले आहेत. ब्रह्मसिद्धांत निजरूपानें फार तर शके १००० पर्यंत प्रचारांत असेल. भास्कराचार्यानंतर तो नित्य प्रचारांतून गेला असावा. इतकेंच नाहीं, तर ब्रह्मसिद्धांताचें सर्व काम भास्कराचार्यकृत सिद्धांतशिरोमणीनें उत्कृष्ट होऊं लागल्यामुळें ब्रह्मसिद्धांत पुस्तकही लोपत चाललें असावें असें दिसतें. भास्कराचार्यानंतरच्या ग्रंथांत ब्रह्मसिद्धांतांतले उतारे क्वचितच दृष्टीस पडतात. सांप्रत महाराष्ट्रांत ब्रह्मसिद्धांत पुस्तक बहुधा फारसें आढळत नाहीं. इतर प्रांतांतही हीच अवस्था असावी.

एकंदरींत पाहतां ज्योतिःशास्त्र ज्या रूपानें आपल्या देशांत आढळतें त्याच्या पद्धतीच्या बहुतेक अंगांची स्थापना ब्रह्मगुप्ताच्या वेळीं पूर्णपणें झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. वेधानें ग्रहस्थितीमध्यें फरकार व्हावयाचा तो मागाहून वेळोवेळीं झाला. परंतु पद्धतीमध्यें नवीन शोध किंवा सुधारणा अयनगतीवांचून दुसरी मागाहून विशेष झाली नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. ग्रहभगण, मंदोच्चें, पात यांसंबंधें ब्रह्मगुप्त हा स्वतंत्र शोधक होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. ग्रहस्पष्टीकरणसंबंधें उपकरणेंही त्याचीं स्वतंत्र दिसतात. त्रिप्रश्नाधिकारांतही याचें पूर्वग्रंथकारांपेक्षां जास्त कौ-

ज्योतिःशास्त्रस्थिति.

---

* मूळ श्लोक सदर्हू पुस्तकांत बराच अशुद्ध आहे. तो आणि मीं शुद्ध केलेला श्लोक व त्याविषयीं [illegible] प्रो० भांडारकरांचा पुस्तकसंग्रहाचा स. १८८३।८४ चा रिपोर्ट पृ. ४२९।३० [illegible] पहा.

पाहिले तर त्यानें आपल्यास आर्यभटशिष्य असें कोठे ह्मटलें नाहीं. उलटें त्या श्लोकांतील शब्दांवरून तो आर्यभटाचा शिष्य नव्हता असें सहज मनांत येतें.

यावरून त्याचा काल शके ४२० हा नव्हे. आर्यभटाच्या मागाहून बरेच वर्षांनीं तो झाला असावा.

लल्लानें रेवती योगतारेचा भोग ३५९ अंश दिला आहे. लल्लतंत्राप्रमाणें स्थिति मोजण्याचें जें आरंभस्थान ( ह्मणजे स्पष्टमेषसंक्रमणकालीं जें सूर्याचें स्थान ) त्याच्या पश्चिमेस एक अंशावर रेवती योगतारा असण्याचा काल सुमारें शके ६०० येतो. परंतु ब्रह्मगुप्तास लल्लाचा ग्रंथ माहित नव्हता असें वर दाखविलेंच आहे. व लल्लाच्या ग्रंथांत ब्रह्मगुप्तानें सांगितलेलें तुरीय यंत्र नाहीं, बाकी सर्व आहेत. यावरून ब्रह्मगुप्ताचा ग्रंथ लल्लास माहित नव्हता असें दिसतें. यावरून दोघे समकालीन, परंतु परस्परांपासून दूर रहाणारे असावे असें अनुमान होतें.

लल्लकृत रत्नकोशाच्या आधारें श्रीपतीनें रत्नमालाग्रंथ केला आहे. श्रीपतीचा काल शक ९६१ हा आहे. त्याच्या पूर्वीं बराच काल लल्ल झाला असला पाहिजे.

याच्या ग्रंथांत अयनचलनाचा विचार मुळींच नाहीं. यावरून तो ब्रह्मगुप्ताच्या सुमारासच झाला असावा.

सर्व गोष्टींचा विचार करितां लल्लांचा काल सुमारें शके ५६० असावा असें अनुमान मी करितों.

धीवृद्धिदकार लल्लास भास्कराचार्यानें पुष्कळ दोष दिले आहेत, हें खरें, तरी

योग्यता.

पूर्वोक्त बीजसंस्कार त्यानें स्वतः दृक्प्रत्यय घेऊन काढिला असें वरील २० व्या श्लोकांत तो ह्मणतो. यावरून तो स्वतः वेध घेणारा आणि शोधक होता असें दिसून येतें; आणि ही गोष्ट त्यास मोठी भूषणास्पद आहे. बुधादिकांच्या संस्कारावरून दिसतें कीं, तो संस्कार देणें आर्यभटानंतर कांहीं कालानें अवश्य झालें असलें पाहिजे. हा लल्लोक्त संस्कार प्रथमार्यसिद्धांतोक्त ग्रहांस देऊन करणप्रकाश ( शके १०१४ ) आणि भटतुल्य ( शके १३३९ ) हे करणग्रंथ झाले आहेत, हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

## पद्मनाभ.

या नांवाच्या एका बीजगणितग्रंथकाराचा उल्लेख भास्कराचार्यांच्या बीजगणितांत आला आहे. पुढें वर्णिलेल्या श्रीधराच्या ग्रंथावरून तो श्रीधराच्या पूर्वीं झाला असावा असें *कोलब्रूकनें लिहिलें आहे. तेव्हां श्रीधराच्या कालावरून पद्मनाभाचा काल शके ७०० हून अर्वाचीन नाहीं असें दिसून येतें.

## श्रीधर.

पुढें वर्णिलेल्या महावीराच्या ग्रंथावरून दिसतें कीं, त्याच्या पूर्वीं श्रीधर नांवाचा एक ग्रंथकार होऊन गेला, आणि त्याचा व्यक्त गणितावर भास्कराचार्यांच्या लीलावतीसारखा एक ग्रंथ होता *कोलब्रूकाला श्रीधराचा गणितसार म्हणून एक

---

* Colebrooke's Mis. Ess. pp. 422, 450, 470 पहा.

[illegible] आर्यभटानंतर झाला हें उघड आहे. त्याचा काल ठरविण्यास कांहीं प्रमाणें [illegible].

[illegible] आर्यभटटीकाकार परमादीश्वर यानें आपल्या टीकें- [illegible] कीं " [illegible] लल्लाचार्यः " म्हणजे आर्यभटाचा शिष्य लल्ल अ- [illegible] म्हटलें आहे, यावरून, व मुख्यतः बीजसंस्काराच्या रीतींत " श- [illegible] ४२० वजा करावे " असें म्हटलें आहे यावरून, लल्लाचा काल शके ४२० च [illegible] असें [illegible] म्हणतो. कै० वा० जनार्दन बाळाजी मोडकही तसेंच म्हण- [illegible] ( [illegible] मासिकपुस्तक आगष्ट १८८५ चा अंक पृष्ठ १२० ). आणखीही [illegible] असेल, परंतु तें म्हणणें चुकीचें आहे. कारण एक तर लल्ल [illegible] आर्यभटाचा शिष्य आणि त्याचा समकालीन असता तर भास्कराचार्यानें ल- [illegible] जे दोष दाखविले आहेत तशा चुका क्षुल्लक गोष्टींत तो करताना. प्रथमार्यभ- [illegible] ग्रंथांत ते दोष नाहींत. दुसरें असें कीं शके ४२० हा जर लल्लाचा काल अ- [illegible] तर प्रथमार्यभटाच्या ग्रंथावर, त्यांत फारसे दोष नसतांही, ब्रह्मगुप्तानें दूषणां- [illegible] वृष्टि केली आहे, तर खरोखरच ज्या लल्लाच्या ग्रंथांत दोष आहेत त्यावर ब्रह्म- गुप्तानें [illegible] करून सोडली असती. परंतु ब्रह्मसिद्धांतांत लल्लाचें नांव किंवा त्याचें [illegible] मत नाहीं. शिवाय, कोणत्याही सिद्धांतास बीजसंस्कार उत्पन्न होतो तो त्या- [illegible] कांहीं उत्पन्न होत नाहीं. त्यावरून येणाऱ्या ग्रहांत जेव्हां बरेंच अंतर पडूं लागतें [illegible] बीजसंस्कार कोणी तरी देतो. आर्यभटाचा ग्रंथ शके ४२१ मध्यें झाला आणि [illegible] त्याच्या शिष्यानें त्यांत फेरफार केला हें अगदीं संभवत नाहीं. तसें [illegible] तर स्वतः आर्यभटानेंच तो संस्कार हिशेबांत घेऊन भगण दिले असते. लल्ला- [illegible] संस्कार काढण्याच्या रीतींत शकांत ४२० वजा करावे असें आहे. एवढ्यावरून [illegible] संस्कार त्याच वेळीं दिला असें होत नाहीं. ब्रह्मसिद्धांतास बीजसंस्कार दिला आहे, [illegible] कलियुगारंभापासून आहे. तसाच सांप्रतच्या सूर्यसिद्धांतासही कलियुगारंभा- पासून आहे. परंतु यावरून तो संस्कार कलियुगारंभींच वस्तुतः उत्पन्न झाला हें म्ह- णणें हास्यास्पद आहे. तसेंच लल्लोक्त संस्कार ४२० मध्येंच उत्पन्न झाला हें म्हणणें आहे. आणखी एक प्रमाण यांत चालतां येईल. तें असें: मिथ्याज्ञानाध्यायांत लल्ल म्हणतो:—

यदि च भ्रमति क्ष्मा तदा स्वकुलायं कथमाप्नुयुः खगाः ॥ ४२ ॥

यांत पृथ्वी फिरते असें म्हणणारास लल्लानें दोष दिला आहे. परंतु प्रथमार्य- भट मात्र पृथ्वी फिरते म्हणतो, तेव्हां त्याचा साक्षात् शिष्य त्याच्या विरुद्ध मताचा असेल, निदान तो त्यास दोष देईल, असें बहुधा संभवत नाहीं. एकंदरींत पाहतां लल्ल पहिल्या आर्यभटाचा शिष्य असणें अगदीं संभवत नाहीं. भास्कराचार्यांच्या ग्रंथांत पुष्कळ वेळां लल्लाचें नांव आलें आहे, परंतु त्यानें त्यास कोठेंच आर्यभट- शिष्य किंवा नुसतें " शिष्य " असेंही म्हटलें नाहीं. सूर्यसिद्धांतटीकाकार रंगनाथ यानें " शिष्यधीवृद्धिदतंत्र " असें एकदां म्हटलें आहे. त्या- चा अर्थ शिष्यांच्या धीचें वृद्धिद एवढाच आहे. लल्लास परमादीश्वरानें आर्यभटाचा शिष्य कोणत्या आधारानें म्हटलें नकळे. स्वतः लल्लाचे वरील श्लोक

ण्याचा याचा उद्देश आहे. परंतु ब्रह्मगुप्ताच्या नंतर हा झाला अशी मला खात्री वाटते. कारण हा आपला सिद्धांत कलियुगारंभानंतर लवकरच झाला असें म्हणतो, तरी आपली गणना पौरुषग्रंथकारांतच करतो. ब्रह्मगुप्ताच्या पूर्वी याचें वर्षमान किंवा इतर मानें प्रचारांत असल्याचें कांहीं अन्य प्रमाण नाहीं. आणि ब्रह्मगुप्तानें आर्यभटास दिलेलीं दूषणें सर्व पहिल्या आर्यभटसिद्धांतास लागतात; याच्यास मुळींच लागत नाहींत. याच्या सिद्धांतांतील कोणत्याच गोष्टीचा उल्लेख ब्रह्मगुप्तानें केला नाहीं. जर त्या वेळेस हा सिद्धांत उपलब्ध असता तर याचीं कांहीं तरी दूषणें काढल्यावांचून ब्रह्मगुप्त राहताना. पंचसिद्धांतिकेंत अयनगति आहे असें दिसत नाहीं. पहिला आर्यभट, ब्रह्मगुप्त आणि लल्ल यांच्या ग्रंथांत ती नाहीं. या आर्यसिद्धांतांत ती आहे. आणखी पहिल्या आर्यभटास ब्रह्मगुप्तानें जीं जीं दूषणें दिलीं आहेत तीं तीं सुधारण्याचा यानें प्रयत्न केलेला दिसतो. ह्याच्या ग्रंथांत युगपद्धति आहे. कल्पारंभ रविवारीं आहे. आणि पहिल्या आर्यभटाच्या ग्रंथांत युगारंभापासून गणित असून त्या वेळीं मध्यमग्रह मात्र एकत्र येतात, स्पष्ट एकत्र येत नाहींत, याबद्दल ब्रह्मगुप्तानें दूषण दिलें आहे (अ. २ आर्या ४६ ). परंतु या आर्यभटाच्या ग्रंथाप्रमाणें सृष्ट्यारंभीं स्पष्ट ग्रह एकत्र येतात. या सर्व प्रमाणांवरून मला खात्रीनें वाटतें कीं ब्रह्मगुप्तानंतर म्हणजे शके ५८७ च्या नंतर हा झाला. ही त्याच्या कालाची प्राचीन मर्यादा झाली. अर्वाचीन मर्यादा पाहिली तर भास्कराचार्यानें याचा उल्लेख केला आहे. सिद्धांतशिरोमणीच्या स्पष्टाधिकारांत ६५ व्या श्लोकांत तो म्हणतो "आर्यभटादिभिः सूक्ष्मत्वार्थं दृक्काणोदयाः पठिताः" दृक्काण ह्मणजे राशीचा तिसरा अंश, म्हणजे १० अंश. पहिल्या आर्यभटानें लग्नमानें तीस तीस अंशांचीं सांगितलीं आहेत, दहा दहा अंशांचीं नाहींत. परंतु दुसऱ्या आर्यभटानें अध्याय ४ आर्या ३८-४० यांत दृक्काणोदय (लग्नमानें) सांगितलीं आहेत. याप्रमाणें दृक्काणोदय सांप्रत दुसऱ्या आर्यभटाखेरीज दुसऱ्या कोणाच्या ग्रंथांत आढळत नाहींत. यावरून भास्कराचार्यानें वरील वाक्यांत म्हटलेला आर्यभट पहिला नव्हे, दुसरा होय. यावरून शके १०७२ पूर्वी दुसरा आर्यभट झाला असला पाहिजे हें उघड आहे. यानें अयनांश काढण्याची रीति दिली आहे. तीवरून अयनगति सर्वदा सारखी येत नाहीं, पुष्कळ कमजास्त होते ( याविषयीं जास्त विवेचन अयनचलनविचारांत येईल ). परंतु अयनगति सर्वदा सारखी असते म्हटली तरी चालेल. तींत फरक पडतो तो फारच थोडा पडतो. सांप्रतच्या सूर्यसिद्धांतांत गति सर्वकाल सारखीच आहे, परंतु त्याचा काल निश्चितपणें माहीत नाहीं. राजमृगांकग्रंथांत ( शके ९६४ ) अयनगति सर्व काल सारखी मानली आहे. त्यापूर्वीचें निश्चित प्रमाण सध्या उपलब्ध नाहीं. यावरून अयनगतीचें ज्ञान बरोबर होण्याच्या पूर्वी दुसरा आर्यभट झाला असावा. भटोत्पलाच्या टीकेंत ( शके ८८८ ) पुष्कळ ग्रंथांतले उतारे आहेत, परंतु दुसऱ्या आर्यसिद्धांतांतला नाहीं. यावरून दुसरा आर्यभट भटोत्पलाच्या पूर्वी झाला असल्यास नुकताच झाला असावा.

दुसऱ्या आर्यसिद्धांतावरून येणारे अयनांश आणि त्याच्या स्पष्टमेषसंक्रमणकालीं त्या अयनांशांइतका सायन रवि हीं दोन्ही समान येण्याचा काल सुमारें

ग्रंथ त्रिशतिका होय, त्यांत अंकगणित आणि क्षेत्रगणित हे विषय होते. यावरून हा श्रीधर आणि महावीराच्या ग्रंथांत आलेला श्रीधर एकच असें दिसतें. आणि महावीराच्या कालावरून या श्रीधराचा काल शके ७७५ हून अर्वाचीन नाहीं असें दिसून येतें. भास्कराचार्यानें श्रीधर म्हणून एक बीजगणितग्रंथकार लिहिला आहे तो हाच असावा.

## महावीर.

गणितसारसंग्रह नांवाचा एक ग्रंथ व्यक्तगणितावर आहे. ह्मणजे त्यांत अंकगणित आणि क्षेत्रगणित हे विषय आहेत. त्याची एक त्रुटित प्रत कै० डा० भाऊ दाजी यांच्या संग्रहांतली माझ्या पहाण्यांत आली. तींतल्या आरंभींच्या वर्णनावरून दिसतें कीं, महावीर हा जैनधर्मी होता, आणि जैनधर्मी राजा अमोघवर्ष ह्याचा त्याला आश्रय होता. यावरून राष्ट्रकूटवंशांतला जैनधर्मी राजा पहिला अमोघवर्ष याच्या राज्यांत म्हणजे शके ७७५ च्या सुमारास हा झाला असें दिसून येतें.

सारसंग्रहग्रंथ भास्कराचार्याच्या लीलावतीसारखा आहे; परंतु तिजपेक्षां तो विस्तृत आहे. त्याची ग्रंथसंख्या सुमारें २००० तरी असावी.

सारसंग्रहांत वर वर्णिलेल्या श्रीधराचार्य नामक ग्रंथकाराच्या ग्रंथांतील मिश्रकव्यवहारांतलीं कांहीं वाक्यें आलीं आहेत.

## द्वितीय आर्यभट ( सुमारें शके ८७५ ).

ग्रंथ.

आर्यभटाचा एक सिद्धांत पूर्वी सांगितला त्यावेगळा दुसरा एक आर्यसिद्धांत आहे. पुणें इ. कालेजसंग्रहांत त्याची एक प्रत आहे, तींत त्यास लघु आर्यसिद्धांत म्हटलें आहे. परंतु स्वतः ग्रंथकार त्यास वृद्ध किंवा लघु असें कांहींच कोठें म्हणत नाहीं. पहिल्याच आर्येंत तो म्हणतो:

विविधतरागमसाराकुट्टकबीजादिदृष्टसारेण ॥
आर्यभटेन क्रियते सिद्धांतो रुचिर आर्याभिः ॥ १ ॥

यांत तो आपल्या ग्रंथास सिद्धांत असेंच ह्मणतो. हा पूर्वीच्या आर्यभटाहून अर्वाचीन आहे, म्हणून यास द्वितीय आर्यभट आणि याच्या सिद्धांतास द्वितीय आर्यसिद्धांत असें सोईसाठीं म्हणणें बरें म्हणून मीं तसें केलें आहे.

काल.

यानें आपला काल सांगितला नाहीं. यानें पाराशरसिद्धांतनामक दुसऱ्या एका सिद्धांतांतील मध्यममानें आपल्या सिद्धांतांत दिलीं आहेत. त्या दोन्ही सिद्धांतांविषयीं तो म्हणतो:

एतत्सिद्धांतद्वयमीषद्याते कलौ युगे जातं ॥ २ ॥

अध्याय २.

यावरून कलियुग लागल्यावर लवकरच हे दोन सिद्धांत आले असें दाखवि-

| | द्वितीय आर्यसिद्धांत. | पाराशरसिद्धांत. |
|---|---|---|
| सृष्ट्युत्पत्तिवर्षे | ३०२४००० | ० |
| | कल्पांत | कल्पांत |
| नक्षत्रभ्रम | १५८२२३७५४२००० | १५८२२३७५७०००० |
| रविभगण | ४३२०००००० | ४३२०००००० |
| सावन दिवस | १५७७९१७५४२००० | १५७७९१७५७०००० |
| चंद्रभगण | ५७७५३३३४००० | ५७७५३३३४५१५ |
| चंद्रोच्चभगण | ४८८१०८६७४ | ४८८१०४६३४ |
| राहुभगण | २३२३१३३५४ | २३२३१३२३५ |
| मंगळ | २२९६८३१००० | २२९६८३३०३७ |
| बुध | १७९३७०५४६७१ | १७९३७०५५४७४ |
| गुरु | ३६४२२१६८२ | ३६४२१९९५४ |
| शुक्र | ७०२२३७१४३२ | ७०२२३७२१४८ |
| शनि | १४६५६९००० | १४६५७१८१३ |
| सौरमास | ५१८४०००००० | ५१८४०००००० |
| अधिमास | १५९३३३४००० | १५९३३३४५१५ |
| चांद्रमास | ५३४३३३३४००० | ५३४३३३३४५१५ |
| तिथि | १६०३००००२०००० | १६०३००००३५४५० |
| क्षयाह | २५०८२४७८००० | २५०८२४६५४५० |

| | द्वितीय आर्यसिद्धांत | पाराशरसिद्धांत. | द्वि. आर्य-सिद्धांत. | पाराशर-सिद्धांत. |
|---|---|---|---|---|
| | कल्पांत उच्चभगण. | | कल्पांत पातभगण. | |
| रवि | ४६१ | ४८० | | |
| मंगळ | २९९ | ३२७ | २९८ | २४५ |
| बुध | ३३९ | ३५६ | ५२४ | ६४८ |
| गुरु | ८३० | ९८२ | ९६ | १९० |
| शुक्र | ६५४ | ५२६ | ९४७ | ८९३ |
| शनि | ७६ | ५४ | ६२० | ६३० |

| | दि. | घ. | प. | वि. | प्र. वि. |
|---|---|---|---|---|---|
| वर्षमान द्वि. आर्यसिद्धांत | ३६५ | १५ | ३१ | १७ | ६ |
| ,, पाराशरसिद्धांत | ३६५ | १५ | ३१ | १८ | ३० |

आर्यसिद्धांताप्रमाणें सृष्ट्युत्पत्तीकडे कांहीं वर्षें मानलीं आहेत; पाराशराप्रमाणें मानलीं नाहींत. दोहों मानांनीं कलियुगारंभीं सर्व ग्रह एकत्र येत नाहींत, सृष्टिप्रचारारंभीं मात्र येतात. दोहोंचीं वर्षमानें बीजसंस्कृतब्रह्मतुल्य वर्षमानाच्या जवळ

[illegible] ९०० येतें. त्यापूर्वी तो झाला असल्यास थोडीच वर्षे आला [illegible].

[illegible] शककाल ८७५, च्या सुमारास तो झाला असावा. याच्या व [illegible] सिद्धांतांचा बेंटलीनें काढलेला काल चुकीचा आहे हें मागें दाखविलेंच आहे. ( पृ. १७५ ).

[illegible] ग्रंथांत १८ अधिकार आहेत, आणि त्यांत सुमारें ६२५ आर्या आहेत.

[illegible]

पहिल्या १३ अध्यायांत करणग्रंथांतील निरनिराळ्या अधिकारांत असणाऱ्या सर्व गोष्टी आहेत. चवदाव्या अध्यायांत [illegible] विचार व प्रश्न आहेत. पंधराव्यांत १२० आर्यांत पाटीगणित म्हणजे अंकगणित आणि क्षेत्रफलघनफल आहे. त्यांत भास्कराच्या लीलावतींतले बहुतेक विषय आहेत. १६ व्यांत भुवनकोश म्हणजे त्रैलोक्यसंस्थाविवेचन आहे. १७ व्यांत ग्रहमध्यगतींची उपपत्ति इत्यादि आहे. व १८ व्यांत बीजगणित, त्यांतही मुख्यत्वें कुट्टकगणित आहे. त्यांत ब्रह्मगुप्तापेक्षां कांहीं विशेष दिसतात.

यानें संख्या दाखविण्याकरितां पाटीगणितांत मात्र प्रसिद्ध संज्ञा योजिल्या आहेत. बाकी सर्वत्र संख्या दाखविण्यास अक्षरसंज्ञा योजिल्या आहेत. त्या संज्ञा पहिल्या आर्यभटाहून भिन्न आहेत.

[illegible]

त्या अशा:—

| वर्ण. | वर्णबोधितसंख्या. | वर्ण. | वर्णबोधितसंख्या. |
|---|---|---|---|
| क, ट, प, य | = १ | च, त, ष | = ६ |
| ख, ठ, फ, र | = २ | छ, थ, स | = ७ |
| ग, ड, ब, ल | = ३ | ज, द, ह | = ८ |
| घ, ढ, भ, व | = ४ | झ, ध, | = ९ |
| ङ, ण, म, श | = ५ | ञ, न, | = ० |

वर्णांनीं संख्या दाखवितांना "अंकानां वामतोगतिः" हा नियम पहिल्या आर्यभटानें मोडिला नाहीं, परंतु यानें मोडिला आहे. आणि डावीकडून उजवीकडे मांडित जावयाचें असा नियम ठेविला आहे. उदाहरण या पद्धतीनें घडफ म्हणजे ४३२ होतात.*

या अक्षरसंज्ञांनीं कसा घोटाळा होतो हें पहिल्या आर्यभटाच्या वर्णनांत दाखविलेंच आहे, तेंच यासही पूर्णपणें लागू आहे.

याच्या सिद्धांतांतील भगणादि मानें आणि यांत दिलेलीं पाराशरसिद्धांतांतील मानें कल्पांतलीं खालीं दिलीं आहेत.

---

* [illegible] ४४ [illegible] ६५१ [illegible] २१०८ [illegible]॥
[illegible]॥

[illegible] अंकसंज्ञांनीं तैत्तिरीयसंहितेंतील कांडें, प्रश्न ( अध्याय ), अनुवाक, [illegible], पदें आणि अक्षरें सांगितलीं आहेत. अंक उजवीकडून डावीकडे लिहावयाचा हा नियम [illegible] आहे ( [illegible] लिहिले आहेत. ) कांहीं अंकांविषयीं संशय आहे, ते लिहिले नाहींत. हा [illegible] तैत्तिरीय [illegible] आहे असें एका तैलंग ब्राह्मणानें मला सांगितलें. मी [illegible] पाहिलें नाहीं.

लागतो. तेव्हां **चंद्रदर्शन** झालें असें ह्मणतात; चंद्राचा उदय झाला असें ह्मणत नाहींत. त्याचप्रमाणें तारा व ग्रह सूर्याजवळ असतां पूर्वी दिसत नसून पुढें प्रथमच जेव्हां दिसतात तेव्हां त्यांचें दर्शन झालें, व दिसतनासे होतात तेव्हां त्यांचें अदर्शन झालें असें ह्मणावें हें बरें. परंतु आमच्या बहुतेक ज्योतिःशास्त्रकारांनीं सूर्यसान्निध्यवशात् होणाऱ्या दर्शनादर्शनांस उदयास्त ह्याच संज्ञा योजिल्या आहेत, व त्याच सांप्रत प्रचारांत आहेत. चंद्राच्या नित्योदयास्ताचा पुष्कळ लोक विचार करितात व त्याचें कारणही पडतें; व त्याचप्रमाणें सूर्यसान्निध्यामुळें होणाऱ्या त्याच्या दर्शनाचाही लोकांस फार परिचय; ह्मणून दोहोंस भिन्न संज्ञा योजणें भाग पडलें. परंतु ग्रहनक्षत्रांच्या नित्योदयास्ताचा कोणी बहुधा फारसा विचार करीत नाहीं. यामुळें सूर्यसान्निध्यामुळें होणाऱ्या त्यांच्या दर्शनांसच उदयास्त शब्द लावूं लागले असें दिसतें.

गुरु आणि शुक्र हे अस्तंगत असतां मौंजीबंधन, विवाह, इत्यादि संस्कार; तसेंच व्रतें, वास्तुप्रतिष्ठा, इत्यादि कृत्यें होत नाहींत.

नीचस्थे वक्रसंस्थेप्यतिचरणगते बालवृद्धास्तगे वा
संन्यासो देवयात्राव्रतनियमविधिः कर्णवेधस्तु दीक्षा ॥
मौंजीबंधोंगनानां परिणयविधिर्वास्तुदेवप्रतिष्ठा
वर्ज्याः सद्भिः प्रयत्नात् त्रिदशपतिगुरौ सिंहराशिस्थिते वा ॥

लल्ल.

बाले वा यदि वा वृद्धे शुक्रे वास्तंगते गुरौ । मलमास इवैतानि वर्जयेद्देवदर्शनं ॥

बृहस्पति.

हीं व यांसारखीं दुसरीं वचनें धर्मशास्त्रनिबंधकारांनीं दिलीं आहेत. गुरुशुक्र अस्तंगत असतां मात्र सांप्रत विवाहादि कृत्यें कोणी करीत नाहींत. त्यांची नीचस्थता, वक्रत्व, अतिचार, यांचा कोणी बहुधा विचार करीत नाहींत. असो. ग्रह व नक्षत्रें यांत गुरु व शुक्र यांचे मात्र अस्त धर्मकृत्यांस प्रतिकूल मानतात. हे दोन ग्रह इतरांपेक्षां तेजस्वी आहेत. नक्षत्रांपैकीं कोणतीं तरी नक्षत्रें नेहमीं अस्तंगत असतातच. बुधाचे अस्त वर्षांतून सुधारें सहा वेळा होतात. मंगळाचा अस्त बऱ्याच काळानें होतो, तरी एकदां झाला म्हणजे पांच महिनेपर्यंत मंगळ दिसत नाहीं. तेव्हां बुध, मंगळ आणि नक्षत्रें यांचे अस्त धर्मकृत्यांस प्रतिबंधक होत नाहींत, ही गोष्ट धर्मशास्त्राचें **व्यवहारानुकूलत्वच** दाखविते. तरी शनीचा अस्त व्यवहारास नडणारा नसूनही धर्मशास्त्रकारांनीं त्याच्या त्याज्यात्याज्यत्वाचा विचार केला नाहीं हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे. तो पापग्रह मानिला आहे, त्यामुळें त्याचा अस्त त्याज्य मानिला नसावा.

ग्रहाचा पूर्वेस उदयास्त व्हावयाचा असतां सूर्य व तो ग्रह यांच्या नित्योदयकालांत अमुक अंतरापेक्षां कमी अंतर झालें ह्मणजे त्याचा अस्त होतो व जास्त झालें ह्मणजे उदय होतो; तसेंच पश्चिमेस उदयास्त व्हावयाचा असतां सूर्य व ग्रह यांच्या नित्यास्तांत अमुक अंतर झालें म्हणजे उदयास्त होतो; असे नियम आमच्या प्राचीन ज्योतिःशास्त्रकारांनीं सांगितले आहेत. उदाहरणार्थ, गुरु व सूर्य यांच्या नित्योदयास्तांत सुमारें ११० पळें अंतर पडलें म्हणजे गुरूचा उदयास्त होतो. ग्रहादिकांच्या

आणि सूर्यलंबन २१५१ ठरविलें *होतें. यावरून या **दोघांहीपासून आमच्या लोकांनीं हीं मानें घेतलीं नाहींत** असें दिसून येतें.

सूर्याच्या तेजामुळें त्याच्या बिंबाच्या द्वादशांशास ग्रहण लागलें तरी दिसत नाहीं; चंद्रबिंबाच्या षोडशांशास लागलें तरी दिसतें; गणितानें याहून कमी ग्रास येईल तेव्हां ग्रहण सांगूं नये; असें भास्कराचार्यानें लिहिलें आहे. इतर बहुतेकांनींही याप्रमाणेंच याहून किंचित कमी किंवा जास्त भाग दिसत नाहीं असें लिहिलें आहे. परंतु १९ आगस्ट १८८७ या दिवशीं सूर्यग्रहण होतें त्यावेळीं ग्वाल्हेर एथे त्याचा ग्रास सूर्यबिंबाच्या $\frac{?}{?}$ ह्मणजे सुमारें चवदावा हिस्सा होता, तो विसाजी रघुनाथ लेले यांनीं नुसत्या डोळ्यांनीं व भिंगास काजळ लावून अशा दोन प्रकारांनीं पाहिला, तो चांगला दिसला. मात्र नुसत्या डोळ्यांनीं इतका अल्पग्रास पाहणें फार धोक्याचें आहे, डोळ्यास फार इजा होण्याचा संभव आहे, असें त्यांच्या अनुभवास आलें.

## ( ६ ) छायाधिकार.

कांहीं करणग्रंथांत हा अधिकार निराळा मुळींच नसतो. ग्रहलाघवांत हा निराळा दिला आहे. सूर्याखेरीज इतर ग्रहांचे नित्योदयास्तकाल, त्यांचें दिनमान (क्षितिजावर राहण्याचा काल ), इष्टकालीन छाया, वेध, इत्यादि गोष्टींचें गणित या अधिकारांत असतें.

## ( ७ ) उदयास्त (दर्शनादर्शनें ).

ग्रहांचे उदयास्त ही एक आपल्या देशांत महत्वाची गोष्ट आहे. गुरुशुक्रांचा अस्त असतां विवाहादि धर्मकृत्यें वर्ज्य आहेत. यामुळेंच मुख्यतः ह्या गोष्टीस महत्व आलें आहे. आणि ज्योतिषग्रंथांप्रमाणें दृक्प्रत्यय येतो कीं नाहीं हें पाहण्याचें हें एक साधन अशी समजूत झालेली आहे.

ग्रह व तारा सूर्याच्या जवळ असतात तेव्हां सूर्योदयापूर्वी व सूर्यास्तानंतर त्या क्षितिजावर असून त्यावेळीं सूर्य क्षितिजावर नसतांही त्या दिसत नाहींत. याप्रमाणें ग्रह व तारा आठपंधरा दिवस किंवा कांहीं महिने दिसत नाहींत. तारा आणि ग्रह प्रथम दिसत असून ते व सूर्य यांतील अंतर कमी होतां होतां ज्या दिवशीं ते दिसतनासे होतात त्या दिवशीं त्यांचा अस्त झाला असें ह्मणतात. आणि ते सूर्याजवळ असल्यामुळें पूर्वी दिसत नसून ते व सूर्य यांतील अंतर वाढतां वाढतां ज्या दिवशीं दिसूं लागतात त्या दिवशीं त्यांचा उदय झाला असें ह्मणतात. तारा आणि ग्रह यांचें नित्य क्षितिजाच्या वर येणें व खालीं जाणें यांस उदयास्त ह्मणतात, व ते सूर्यसान्निध्यवशात् दिसतनासे होतात व दिसूं लागतात ह्यांसही अस्तोदय ह्मणतात. यावरून उदयास्त शब्द दोन अर्थी योजतात असें दिसून येईल. या दोहोंस भिन्न संज्ञा असाव्या हें बरें. व चंद्रासंबंधें अशा आहेतही. कृष्णपक्षीं चंद्र हा सूर्याच्या जवळ येतां येतां अमावास्येच्या सुमारास सूर्याच्या फार जवळ येऊन दिसेनासा होतो. व अमावास्येनंतर शुक्ल प्रतिपदेस किंवा द्वितीयेस पश्चिमेस दिसूं

* बर्जेसचें सू. सि. भाषांतर पृ. १२७ पहा. हीं मानें हिंदुस्थानाशीं बरींच जुळतात म्हणून तीं हिंदूंनीं ग्रीकांपासून घेतलीं असें व्हिटनें ध्वनित करतो. परंतु हा केवळ पक्षपात आहे. अशा ठिकाणीं थोड्या कलांचा फरक असला तरी तो पुष्कळ होय हें कोणी विचारी मनुष्य कबूल करील.

गणित चुकतें असें नाहीं. त्यांतलें गणित खरें आहे असें दुसऱ्या अनेक प्रमाणांनीं सिद्ध होतें. अस्तोदय न मिळण्याचीं कारणें निराळीं आहेत. मुख्यतः कालांशासंबंधें चुकीमुळें ते जमत नाहींत. ग्रहलाघवाच्या ग्रहगणितांत नेहमीं बहुधा थोडीबहुत चुकी सांप्रत असते. त्यांतले अस्तोदय जमले तरी ते काकतालीयन्यायानेंच होत. कालांश ठरवितांना ग्रह व रवि यांच्या नित्योदयास्तकालांचें अंतर किती हें प्रत्यक्ष पाहिलें पाहिजे किंवा गणितानें त्या ग्रहांची जी स्थिति त्या वेळीं आली असेल तीवरून गणितानें काढलें पाहिजे. सूर्य मात्र क्षितिजांत आल्याबरोबर दिसतो. परंतु अस्तोदय पाहण्याची संधि सूर्योदयापूर्वीं किंवा सूर्यास्तानंतर कांहीं वेळ असते, त्या वेळेस संधिप्रकाश असतो, यामुळें त्या वेळीं कोणताही ग्रह क्षितिजांत असतां दिसत नाहीं. क्षितिजापासून कांहीं तरी वर येईल तेव्हां मात्र दिसतो. यामुळें ग्रह व सूर्य यांच्या उदयांचें किंवा अस्तांचें अंतर प्रत्यक्ष पाहून बरोबर काढतां यावयाचें नाहीं. कदाचित् कांहीं उपायांनीं काढिलें तरी तें काढण्यास काल व कोन फार सूक्ष्मपणें मोजण्याचीं हल्लींप्रमाणें उत्कृष्ट साधनें प्राचीनकालीं असण्याचा संभव नाहीं. तसेंच ग्रहांच्या उदयास्तकालाच्या स्थितीवरून नित्योदयास्ताचें अंतर गणितानें काढण्यास ती स्थिति अगदीं बरोबर असली पाहिजे. ती बरोबर असेल, म्हणजे अमुक ग्रह आज अमक्या ठिकाणीं किंवा सूर्यापासून अमुक अंतरावर आहे हें बरोबर निघालेलें असेल, तर काल बरोबर निघेल. परंतु प्राचीनकाळीं जेव्हां कालांश ठरविले तेव्हां ग्रहगणित अगदीं सूक्ष्म–नित्योदयास्त कालांत एका पळाचीही चूक पडणार नाहीं इतकें सूक्ष्म–होतें असें मला वाटत नाहीं. या कारणांनीं त्या वेळीं ठरविलेल्या कालांशांत चुकी असण्याचा संभव आहे. ज्या पायावर अस्तोदय काढावयाचे तोच ह्मणजे कालांशच चुकले असल्यावर मग त्यांवरून काढलेले उदयास्त कसे जमावे? आम्ही सायनपंचांगांत गुरूचे कालांश ११ घेतों, ह्मणून ज्या दिवशीं आमच्या पंचांगांत गुरूचा अस्त लिहिला असतो त्या दिवशींच रविगुरूंच्या नित्यास्तांत ११० पळांहून कमी अंतर झालें हें आह्मी खात्रीनें सांगतों. व तें खरें आहे हें दुसऱ्या प्रमाणांवरून पाहतां येईल. परंतु रविगुरूंच्या नित्यास्तांत ११० पळांहून कमी अंतर झाल्याबरोबर गुरूचा अस्त होणें किंवा न होणें ही गोष्ट स्वतंत्र असल्यामुळें गुरूचा अस्त त्याच दिवशीं होईलच असें खात्रीनें ह्मणवत नाहीं. कदाचित् मागें पुढें एकदोन दिवस होईल. तरी तसें झालें असतां नवीन पंचांगांचें गणित चुकलें असें होत नाहीं. तर गुरूचे कालांश ११ हून कमीज्यास्त धरले पाहिजेत, एवढेंच त्यावरून सिद्ध होईल.

सांप्रत ग्रहस्थिति शुद्ध समजण्याचें साधन आहे, आणि कालसाधनेंही आहेत. अशा कालीं कालांश ठरविले पाहिजेत. मीं शक १८११ पर्यंत सहा सात वर्षें या कामीं प्रयत्न केला पुढें दुसऱ्या अनेक व्यासंगांमुळें वेळ सांपडला नाहीं. दृष्टि हळू हळू मंद होऊं लागली; तरी स्वतः व सूक्ष्मदृष्टि शिष्यांच्या साह्यानें कांहीं अनुभव घेतों.*

---

* सृष्टिज्ञान नामक मासिकपुस्तक मुंबई एथे निघत असे त्याच्या मे, जून, जुलै १८८५ च्या अंकांत ग्रहोदयास्ताविषयीं एक सविस्तर निबंध मीं लिहिला आहे. शिवाय माझ्या ज्योतिर्विलास पुस्तकांतलें हें प्रकरण पहावें.

दिवसें दिन सनणांत १० पळांत ते एक अंश क्रमितात. तेव्हां ११० पळांत ११ अंश झाले. हे अंश कालसंबंधें आहेत म्हणून यांस कालांश म्हणतात. रवि व गुरु यांमध्यें ११ कालांश अंतर झालें म्हणजे गुरुचा अस्तोदय होतो असें सांगितलें आहे. ग्रहांचे कालांश निरनिराळ्या ग्रंथांतले खालीं दिले आहेतः—

| | मूळ सूर्यसिद्धांत. | सांप्रतचे सूर्य, रोमश, शा. ब्रा. सोम, सिद्धांत. | प्रथमार्यसिद्धांत. | ब्रह्मगुप्त. सिद्धांत शिरोमणि. | लघु. करण. कुतूहल. | द्वितीयार्यसिद्धांत. | करणप्रकाश. | ग्रहलाघव | केरोपंती ग्र. सा. कोष्टक. | टालमी. | स्वानुभव. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| चंद्र. | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | | १२। |
| मंगळ. | १७ | १७ | १७ | १७ | १७ | १७ | १७ | १७ | १७ | १४¼ | १७ |
| बुध. | १३ | १४ | १३ | १४ | १३ | १३ | १३ | १३ | १३ | ११½ | १३ |
| बुधवक्री. | | १२ | | १२ | १२ | १२॥ | | १२ | | | |
| गुरु. | ११ | ११ | ११ | ११ | ११ | १२ | १२ | ११ | ११ | १२¾ | ११ |
| शुक्र. | ९ | १० | ९ | १० | ९ | ८ | ९ | ७ | ९ | ५¾ | ८ |
| शुक्रवक्री | | ८ | | ८ | ८ | ७॥ | | ६ | | | |
| शनि. | १५ | १५ | १५ | १५ | १५ | १५ | १५ | १५ | १५ | १४ | १५ |

यांत टालमीचे *कालांश कर्कराशींत ग्रह असतां त्या वेळचे आहेत, आणि त्यांत बुधशुक्रांचे पश्चिमास्ताचे आहेत.

केरोपंतांनीं ग्रहसाधन कोष्टकांत दिलेले कालांश सर्वांशीं प्रथमार्यसिद्धांताप्रमाणें आहेत. स्वानुभवावरून त्यांणीं ते दिलेले दिसत नाहींत. कारण त्यांप्रमाणें अनुभव सर्वांशीं येत नाहीं.

गणपत कृष्णाजी आणि निर्णयसागर यांच्या पंचांगांत शुक्राचे मात्र उदयास्त ग्रहलाघवांतील कालांशांवरून काढितात. बाकीचे सर्व आणि इतर ग्रहलाघवी पंचांगांतील शुक्रासुद्धां सर्व उदयास्त, ग्रहलाघवांत एक स्थूल रीति दिली आहे तीवरून काढितात. या देशांतील इतर पंचांगें ज्या ग्रंथांवरून करतात त्यांतील कालांशांवरून त्यांत अस्तोदय काढीत असतील. नाटिकल आल्मनाकवरून केलेलीं नवीन पंचांगें म्हणजे केरोपंती ऊर्फ पटवर्धनी, काशीस्थ देवजीकृत व आमचें सायनपंचांग, इत्यादिकांतही आमच्या कोणत्या तरी ग्रंथांतील कालांशांवरून उदयास्त काढितात याप्रमाणें काढलेले सर्व अस्तोदय नेहमीं कोणत्याच पंचांगाचे मिळत नाहींत. कधीं जमतात, कधीं चुकतात. आतां हें खरें कीं जुन्या पंचांगाचे जितके चुकतात तितके नव्यांचे चुकत नाहींत. नव्यांवरून कां जमत नाहीं याचा कोणी विचार न करितां कांहीं जमत नाहींत एवढ्यावरून ग्रहलाघवाचें गणित चुकतें, तसें नव्या पंचांगांचेंही कधीं कधीं चुकतें, असें सिद्ध करूं लागतात. नवीन पंचांगांचे अस्तोदय कधीं कधीं मिळत नाहींत, यावरून त्यांतलें

* बर्जेसचें सू. सि. भाषांतर पृ. २३२.

ला तरी तो दिसणार नाहीं. ह्मणजे त्याचा उदय होणार नाहीं, बरेच दिवसांनीं मागाहून होईल. शुक्रक्रांति उत्तर असेल तर या देशांत त्याचा नित्योदय सूर्यापूर्वी ३२ मिनिटें झाला तर त्या दिवशीं इंग्लंडांत त्याचा नित्योदय ३२ हून जास्त मिनिटांनीं पूर्वी होईल. ह्मणजे केवळ कालांशाप्रमाणें पाहिलें तर इंग्लंडांत त्याचा उदय कांहीं दिवस अगोदर झाला पाहिजे. परंतु अनुभव तर याच्या उलट येईल. एकाच स्थलीं देखील ग्रहाचे कालांश सारखे असले तरी त्याची क्रांति दक्षिणोत्तर असेल त्याप्रमाणें उन्नतांश कमजास्त होतील. त्यांत फार भेद मात्र पडणार नाहीं. असो; सारांश इतका कीं अस्तोदयाचे कालांश, स्थल जसें जसें विषुववृत्तापासून जास्त उत्तरेस तसे तसे जास्त पाहिजेत आणि कालांशांपेक्षां उन्नतांशांवरून उदयास्ताचे नियम ठरविणें चांगलें.

उन्नतांशसंबंधें विचार वर लिहिला आहे त्यावरून आणि **बार्शी** एथे ( अक्षांश १८।१३ ) मीं जो अनुभव घेतला आहे त्यावरून मला खात्री वाटते कीं आमच्या ग्रंथांतले कालांश आमच्याच देशांत ठरविलेले आहेत. **टालमीचे** कालांश पाहिले असतां सहज दिसतें कीं त्याचा आमच्या ग्रंथांशीं कांहीं संबंध नाहीं. उलटें टालमीच्या कालांशांविषयीं मी असें ह्मणूं शकतों कीं त्यानें ते स्वानुभवानें दिले नाहींत, किंवा अनुभवानें लिहिले असल्यास त्याची ग्रहस्थिति चुकीची होती, किंवा दुसरी कांहीं तरी त्याची चुकी होती. १८ अक्षांशांवर मंगळ, बुध, शुक्र यांचे कालांश १६, १२, ८ यांहून कमी येत नाहींत. तेव्हां अलेक्झांड्रिया ( अक्षांश ३१।१३ ) एथे यांहून जास्त असलेच पाहिजेत. तेव्हां टालमीनें दिलेले मंगळ, बुध, शुक्र यांचे कालांश $१४\frac{१}{२}$, $११\frac{१}{२}$, $५\frac{२}{३}$ हे फार चुकीचे आहेत. स्थलविशेषाचे उदयास्ताचे कालांश किंवा उन्नतांश सूक्ष्मतः निश्चित करतां येतील. ते केले तरी चंद्रप्रकाश, क्षितिजाजवळ कधीं कधीं दिसणारा रक्तिमा, आणि पाहणाराची मंदसूक्ष्मदृष्टि* यांच्या योगानें कालांशाच्या अनुभवांत फरक पडेल. शिवाय मेघांचा प्रतिबंध निराळा. तेव्हां आमच्या धर्मशास्त्रकारांनीं गणितागत उदयास्तदिवसानंतर व पूर्वी ग्रहांच्या बाल्यवृद्धावस्थेचे कांहीं दिवस सोडण्यास सांगितलें आहे तें योग्य आहे.

स्वानुभवावरून सायनपंचांगांत हल्लीं जे कालांश घेतों ते वरील कोष्टकांत दिले आहेत. बुधाचा अस्तोदय ११ कालांशांनीं गुरूचा १० नीं आणि शुक्राचा ७॥ नींही कधीं कधीं होतो असा गो० व० भिडे यांचा हेदवी ( अक्षांश १७।२० ) एथील अनुभव आहे.

## ( ८ ) शृंगोन्नति.

शुक्लपक्षाच्या पूर्वार्धी व कृष्णपक्षाच्या उत्तरार्धी चंद्राचा थोडाच भाग प्रकाशित दिसतो; त्यास शृंग अथवा कोर ह्मणतात. शुक्लपक्षीं सूर्यास्ताच्या सुमारास आ-

---

* सूक्ष्मदृष्टि मनुष्यास आज उदय दिसला तरी मंददृष्टि मनुष्यास मागाहून तीनचार दिवसही दिसत नाहीं, असें अनुभवास आलें आहे. ग्रह आणि सूर्य यांच्या गतींचें अंतर थोडें असतें तेव्हां उदयास्तांत जास्त चूक पडते.

आमच्या सायन पंचांगाच्या मंडळीपैकीं एक गृहस्थ गोपाळ वल्लाळ भिडे* यांनीं या कामीं फार प्रयत्न केला. आमच्या सर्व अनुभवांचें एकीकरण होऊन त्यावरून उदयास्ताचे नियम निश्चित करण्याचें काम अजून पूर्ण झालें नाहीं. शनीचे अस्तोदय शक १८११ पूर्वीच्या पांच वर्षांत बहुधा पर्जन्यकालीं किंवा त्याचे संधीस होत असत यामुळें त्यांबद्दल अनुभव घेण्यास मुळींच संधि सांपडली नाहीं. मंगळाचा अनुभव घेण्याची संधि एकदोन वेळा मात्र आली. वाचकांपैकीं कोणास स्फूर्ति होऊन कोणी अनुभव घेऊन मला कळवितील तर त्यांचे ज्योतिषशास्त्रावर उपकार होतील. उन्हाळ्यांत देखील कधीं कधीं आकाश अभ्राच्छादित असतें; उदयास्तकालाच्या संधीस ग्रह क्षितिजाच्या अगदीं जवळ असतात, आणि इतर आकाश अगदीं स्वच्छ असलें तरी क्षितिजाजवळ अभ्रें असण्याचा संभव असतो. याप्रमाणें अनुभव पाहण्यास पुष्कळ अडचणी येतात. तथापि आमच्या ग्रंथांतले कालांश बरेच सूक्ष्म आहेत असें माझ्या अनुभवास आलें आहे. बुधशुक्र वक्री असतात तेव्हां पृथ्वीला जास्त जवळ असतात. यामुळें तेव्हां ते जास्त तेजस्वी दिसतात हें खरें आहे. तथापि आमच्या कांहीं ग्रंथांत त्यांच्या सरळवक्रस्थितींतल्या कालांशांत जितका भेद दिला आहे तितका तो नाहीं, किंबहुना मुळींच नाहीं ह्मटलें तरी चालेल.

उदयास्तांसंबंधें आमच्या कोणाही ग्रंथकाराच्या लक्षांत आली नाहीं अशी एक

विशेष गोष्ट.

गोष्ट माझ्या लक्षांत आली आहे. उदयास्तकालीं ग्रह सूर्याच्या जवळच असतात. ते दिसूं लागणें हें त्यांच्या तेजस्वितेवर अवलंबून आहे. आणि त्यांची क्षितिजावर उंची ह्मणजे त्यांचे **उन्नतांश** कमजास्त असतील त्या मानानें तेजस्विता कमजास्त होते. आणि पृथ्वीवरील निरनिराळ्या स्थळीं एक ग्रह सूर्यापूर्वी नित्योदय पावून सारखा वेळ झाला असला तरी त्याचे उन्नतांश भिन्न असतील. उत्तर अक्षांश १५ या स्थळीं त्याचे जितके उन्नतांश येतील त्यांपेक्षां उत्तर अक्षांश २५ या स्थळीं कमी येतील. आणि त्याप्रमाणें तेज कमी होईल. आणि १५ अक्षांशांवर त्याचा उदय ज्या दिवशीं होईल त्यापेक्षां २५ अक्षांशांवर मागून होईल; आणि अस्त अगोदर होईल. सूर्योदयापूर्वी नित्योदय किंवा सूर्यास्तानंतर नित्यास्त होण्याचा काल म्हणजे कालांश सारखे आले तरी स्थलभेदाप्रमाणें उन्नतांशांत आणि त्यामुळें अस्तोदयांत भेद पडेल हें आकृति काढून गणितानें सिद्ध करतां येईल. परंतु विस्तरभयास्तव तसें करीत नाहीं. पुढील गोष्टीवरून ती गोष्ट सहज कळेल. आमच्या देशापेक्षां इंग्लंडांत संधिप्रकाश जास्त वेळ असतो. यामुळें आमच्या देशांत एका दिवशीं सूर्यापूर्वी शुक्राचा नित्योदय ३२ मिनिटें झाला आहे (ह्मणजे त्या दिवशीं त्याचे कालांश ८ आहेत) तर त्या दिवशीं त्याचा उदय होईल. परंतु इंग्लंडांत ३२ मिनिटें सूर्यापूर्वी शुक्र उगवला अस-

---

* गोपाळ वल्लाळ भिडे यांस आकाशांतले चमत्कार पाहण्याचा फार नाद होता. ते शक १७७८ मध्यें रत्नागिरी जिल्ह्यांत निवेंडी एथे जन्मले व शक १८१२ मध्यें निवर्तले. इ. स. १८७४ पासून शेवटपर्यंत ते त्या जिल्ह्यांत शाळाखात्यांत नोकर होते. त्यांणीं ग्रहांच्या उदयास्तांचे बरेच अनुभव लिहून ठेविले आहेत, व नक्षत्र योगताराचेंही कांहीं अस्तोदय पाहिले आहेत. ते दीर्घायु होते तर आमच्या ज्योतिषशास्त्रज्ञानवृद्धीस त्यांचा पुष्कळ उपयोग झाला असता.

खा असत नाहीं. यामुळें ध्रुवाभिमुख नक्षत्रध्रुव नेहमीं सारखा असणार नाहीं. सहा ग्रंथांतले नक्षत्रध्रुव दिले आहेत, त्यांत कांहीं फरक आहे, तो कांहीं अंशीं यामुळें असावा. कांहीं योगतारा भिन्न मानल्यामुळेंही कांहीं फरक असेल. सूर्यसिद्धांत, ब्रह्मगुप्तसिद्धांत आणि लल्लतंत्र, यांतील ध्रुव अयनांश फारच थोडे होते अशा वेळेचे आहेत. याविषयीं **भास्कराचार्य** म्हणतो:—

इत्यभावेऽयनांशानां कृतदृक्कर्मका ध्रुवाः। कथिताश्च स्फुटा बाणाः सुखार्थं पूर्वसूरिभिः॥ १७॥

सिद्धांतशिरोमणि, भग्रहयुति.

ब्रह्मगुप्त, लल्ल, यांच्या ग्रंथांत अयनगतीचा उल्लेख नाहीं आणि सूर्यसिद्धांतांत आहे तरी त्यांतील नक्षत्रध्रुव ब्रह्मगुप्त आणि लल्ल यांच्याशीं बरेच मिळतात यावरून भास्कराचार्यांचें ह्मणणें तीनही ग्रंथांतल्या ध्रुवांस लागू आहे. सुंदरसिद्धांताच्या भोगशरांत कांहीं अंक नाहींत याचें कारण त्या सिद्धांताची मला मिळालेली प्रत फार अशुद्ध होती तिजवरून ते अंक समजले नाहींत.

मीं मानिलेल्या योगतारांचे इ० स० १८८७ च्या आरंभींचे मध्यम विषुवांश आणि क्रांति फ्रेंच कालज्ञानपुस्तकांतून घेऊन त्यांवरून शर आणि सायनभोग ध्रुवाभिमुख काढिले. त्यांत चित्राभोग २०१।२६।१६.३ आला. चित्राभोग १८० अंश मानून सर्वांच्या भोगांत अयनांश २१।२६।१६.३ वजा करून आलेले भोग सदहू कोष्टकांत 'मन्मत' या सदरांत दिले आहेत. हे शक १८०९ चे आहेत. शरही अर्थात् त्याच वर्षाचे आहेत. परंतु भोग निरयन असल्यामुळें त्यांत कालभेदानें फरक फारच थोडा पडेल. म्यूपिशियम तारा आरंभस्थानीं मानिली तर मन्मतभोगांत आणखी १ अंश २० कला वजा केल्या पाहिजेत.

सूर्यसिद्धांत आणि ब्रह्मगुप्तसिद्धांत यांतील* ध्रुवाभिमुख शरभोगांवरून कदंबाभिमुख शरभोग गणितानें काढिलेले पृ ४५४।५५ यांतील कोष्टकांत दिले आहेत. द्वितीयार्यसिद्धांतांतले भोगशर कदंबाभिमुख दिसतात ह्मणून ते त्यांतच दिले आहेत. सार्वभौमसिद्धांतांतले भोगशर कदंबाभिमुख आहेत असें त्यांत स्पष्ट सांगितलें आहे. ह्मणून तेही त्यांत दिले आहेत. केतकरांचे आणि माझे कदंबाभिमुख भोगशर प्रथम फ्रेंच किंवा इंग्लिश नाटिकल आल्मनाकवरून काढिलेले आहेत. केतकरांचे भोग झिटा पिशियम आरंभस्थानीं धरून निरयन आहेत आणि माझे चित्राभोग १८० धरून आहेत. एऱ्हवीं वस्तुतः दोघांचे एकच आहेत. मात्र माझ्या योगतारा केतकरांच्याहून सात भिन्न आहेत. त्यांचे मात्र वस्तुतःच भिन्न आहेत. माझ्या अंकांत रेवतीचे अंक दोनदोन आहेत. त्यांत पहिले झिटा पिशियमचे आणि दुसरे म्यू पिशियमचे आहेत. म्यू पिशियम आरंभस्थानीं मानिली तर माझ्या भोगांत आणखी ४३ कला प्रत्येकांत मिळविल्या पाहिजेत.

मूल सूर्यसिद्धांतांतलें नक्षत्रध्रुव पंचसिद्धांतिकेंत दिलेले नाहींत. ते मूळांत नसावे असें दिसतें. पहिल्या **आर्यभटानें** नक्षत्रयोगतारांविषयीं कांहीं सांगितलें नाहीं. **भास्कराचार्यानें** नक्षत्रध्रुवशर **ब्रह्मगुप्ताचे** घेतले आहेत. **बेरुणीनें** ब्रह्मगुप्तोक्त भोग

---

* सूर्यसिद्धांताचे भोगशर त्यांतल्याच रीतीनें व्हिटनेनें काढिलेले दिले आहेत, आणि ब्रह्मसिद्धांतांतले बेंटलीनें काढिलेले त्याच्या पुस्तकांतून घेऊन दिले आहेत.

नि कल्याकडी सूर्योदयाचे सुमारास, त्यांतही विशेषतः शुक्ल प्रतिपदेस किंवा द्वितीयेस. चंद्रदर्शन होतें त्यावेळीं चंद्रशृंगाचा कोणत्या दिशेचा भाग उंच दिसेल आणि चंद्रबिंबाचा किती भाग प्रकाशित दिसेल, हें काढणें हा विषय या अधिकारांत असतो. संहिताग्रंथांत चंद्रशृंगोन्नतीपासून होणाऱ्या फलांचा पुष्कळ विचार केलेला असतो. सूर्याच्या योगानें चंद्र प्रकाशित होतो यामुळें चंद्राच्या ज्या बाजूस सूर्य असेल त्याप्रमाणें चंद्राची शृंगोन्नति दिसेल. अर्थात् तिच्याशीं पृथ्वीवरील शुभाशुभ गोष्टींचा संबंध नाहीं. परंतु वास्तविक कारणांचें ज्ञान होण्यापूर्वी तशी समजूत होणें साहजिक आहे.

## ( ९ ) ग्रहयुति.

दोन ग्रह अगदीं परस्परांजवळ आले असतां त्यांची युति ह्मणजे योग झाला असें ह्मणतात. त्या वेळीं त्यांचें पूर्वपश्चिम अंतर शून्य झालें पाहिजे. तें शून्य असलें तरी त्या वेळीं त्यांमध्यें दक्षिणोत्तर अंतर असूं शकतें, आणि तें त्यांच्या शराप्रमाणें कमजास्त असतें. युतिकालीं दोन ग्रहांच्या किरणांचें मिश्रण झालें किंवा त्यांचें उत्तरदक्षिण अंतर एक अंशाहून कमी असलें ह्मणजे त्यांचें **युद्ध** झालें, आणि एक अंशाहून जास्त अंतर असलें तर **समागम** झाला असें ह्मणतात ग्रहबिंबांचा नुसता स्पर्श झाला ह्मणजे उल्लेख ह्मणतात. आणि बिंबें एकमेकांत मिळालीं ह्मणजे त्यास भेद ह्मणतात. भेदादिकांचीं फलें संहितादि ग्रंथांत पुष्कळ सांगितलीं असतात. भेदाचें लक्षण आणि त्याचें गणित हीं आमच्या ग्रंथांत आहेत; तरी शुक्र कधीं कधीं सूर्यबिंबाचा भेद करितो हें आमच्या लोकांस माहित होतें कीं नाहीं हें समजत नाहीं. ( पृ. २८८ पहा. )

## ( १० ) भग्रहयुति.

या अधिकारांत नक्षत्रयोगतारा आणि ग्रह यांच्या युतींचें गणित असतें आणि त्याकरितां योगतारांचे आणि दुसऱ्या कांहीं तारांचे ध्रुव ( भोग ) आणि शर दिलेले असतात. भोग दिलेले असतात ते बहुतेक ग्रंथांत अयनदृक्कर्मसंस्कृत असतात. ह्मणजे "तारेपासून विषुववृत्तावर काढलेला लंब क्रांतिवृत्तास ज्या बिंदूंत छेदील त्या बिंदूचें आरंभस्थानापासून जें अंतर तो भोग आणि तारेपासून अंतर तो **शर**" अशा लक्षणाचे असतात. या शरभोगांस **ध्रुवाभिमुख** अशी संज्ञा देऊं कांहीं ग्रंथांत भोगशर असतात ते "तारेपासून क्रांतिवृत्तावर टाकिलेला लंब त्यास जेथे छेदील त्या बिंदूचें आरंभस्थानापासून जें अंतर तो भोग आणि तो लंब हा **शर**" अशा अर्थाचे असतात. क्रांतिवृत्ताच्या ध्रुवास कदंब अशीही संज्ञा आहे. म्हणून ह्या शरभोगांस **कदंबाभिमुख** अशी संज्ञा देऊं. पुढें पृ. ४५२।५३ वरील कोष्टकांत ६ ग्रंथांतले ध्रुवाभिमुख शरभोग दिले आहेत. तसेंच नक्षत्रांच्या ज्या योगतारा मानाव्या असें मीं ठरविलें आहे *त्यांचेही ध्रुवाभिमुख शरभोग त्यांत दिले आहेत. अयनगतीमुळें अयनदृक्कर्मसंस्कार नेहमीं सार-

नक्षत्रभोगशर.

---

* सायनपंचांगांत युति देण्यास ह्याच तारा शक १८१९ पासून घेतों. निरनिराळ्या शोधकांस संमत अशा योगतारांचीं युरोपियन नांवें पुढें कोष्टकांत दिलीं आहेत तीं पहा.

## नक्षत्रयोगतारांचे आणि कांहीं इतर तारांचे ध्रुवाभिमुख शर.

| अनुक्रमांक. | तारानाम. | सांप्रतचा सूर्यसिद्धांत. | | ब्रह्मगुप्तसिद्धांत. | | लल्लतंत्र | | भटतुल्यदामोदरीय. | | सुंदर सिद्धांत. | ग्रहलाघव. | मन्मत. | | शरदिशा. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अं. | क. | अं. | क. | अं | क. | अं. | क. | अं. | अं. | अं. | क. | |
| १ | अश्विनी. | १० | | १० | | १० | | १० | | १० | १० | ९ | ५ | उ |
| २ | भरणी | १२ | | १२ | | १२ | | १२ | १५ | १२ | १२ | १० | ५७ | उ |
| ३ | कृत्तिका. | ५ | | ४ | ३१ | ५ | | ४ | ३० | ४ | ५ | ४ | ९ | उ |
| ४ | रोहिणी. | ५ | | ४ | ३३ | ५ | | ४ | ३० | ४॥ | ५ | ५ | ३२ | द |
| ५ | मृग. | १० | | १० | | १० | | १० | . | १० | १० | १३ | २४ | द |
| ६ | आर्द्रा. | ९ | | ११ | | ११ | | ११ | | ११ | ११ | ६ | ४६ | द |
| ७ | पुनर्वसु. | ६ | | ६ | | ६ | | ६ | | ६ | ६ | ६ | ४६ | उ |
| ८ | पुष्य. | ० | | ० | | ० | | ० | | ० | ० | ० | ५ | उ |
| ९ | आश्रेषा. | ७ | | ७ | | ७ | | ७ | | ७ | ७ | ११ | २४ | द |
| १० | मघा. | ० | | ० | | ० | | ० | | ० | ० | ० | २९ | उ |
| ११ | पूर्वा फल्गु. | १२ | | १२ | | १२ | | ११ | ४५ | | १२ | १० | ३१ | उ |
| १२ | उत्तरा फल्गु. | १३ | | १३ | | १३ | | १२ | ४५ | | १३ | १३ | २४ | उ |
| १३ | हस्त. | ११ | | ११ | | ८ | | ११ | | ११ | ११ | १३ | १७ | द |
| १४ | चित्रा. | २ | | १ | ४५ | २ | | १ | ४५ | १॥। | २ | २ | १२ | द |
| १५ | स्वाती. | ३७ | | ३७ | | ३७ | | ३७ | १५ | | ३७ | ३२ | ५६ | उ |
| १६ | विशाखा. | १ | ३० | १ | २३ | १ | ३० | १ | १५ | | १ | ० | २२ | द |
| १७ | अनुराधा. | ३ | ० | १ | ४४ | ३ | | १ | ४५ | | २ | २ | १ | द |
| १८ | ज्येष्ठा. | ४ | | ३ | ३० | ४ | | ३ | ३० | | ३ | ४ | ३७ | द |
| १९ | मूल. | ९ | | ८ | ३० | ८ | ३० | ८ | ३० | | ८ | १३ | ४८ | द |
| २० | पूर्वाषाढा. | ५ | ३० | ५ | २० | ५ | २० | ५ | ३० | | ५ | २ | ७ | द |
| २१ | उत्तराषाढा | ५ | | ५ | | ५ | | ५ | | | ५द | १ | २८उ | |
| | अभिजित्. | ६० | | ६२ | | ६३ | | ६२ | | ६२ | ६२ | ६१ | ५५ | उ |
| २२ | श्रवण. | ३० | | ३० | | ३० | | २९ | ३० | ३० | ३० | २९ | ४९ | उ |
| २३ | धनिष्ठा. | ३६ | | ३६ | | ३६ | | २५ | ३० | ३६ | ३६ | ३४ | १५ | उ |
| २४ | शततारका. | ० | ३० | ० | १८ | ० | २० | ० | १५ | १/३ | ० | ० | २५ | द |
| २५ | पूर्वाभाद्रपदा. | २४ | | २४ | | २४ | | २३ | ४५ | | २४ | २१ | ६ | उ |
| २६ | उत्तराभाद्रपदा. | २६ | | २६ | | २६ | | २६ | | | २७ | १३ | ४५ | उ |
| २७ | रेवती. | ० | | ० | | ० | | ० | | | ० | ० ३ | १४ १८ } | द |
| | अगस्त्य. | ८० | | ७७ | | ८० | | | | ७७ | ७६ | | | द |
| | व्याध. | ४० | | ४० | | ४० | | | | ४० | ४० | | | द |
| | अग्नि. | ८ | | | | . | | | | ८ | ८ | | | उ |
| | ब्रह्मा. | ३० | | | | | | | | ३० | ३० | | | उ |
| | प्रजापति. | ३८ | | | | | | | | ३८ | ३९ | | | उ |
| | अपांवत्स. | ३ | | | | | | | | | ३ | | | उ |
| | आप. | ९ | | | | | | | | | | | | उ |

## नक्षत्रयोगतारांचे आणि कांहीं इतर तारांचे ध्रुवाभिमुख भोग.

| तारानाम. | सांप्रतचा सूर्यसिद्धांत. | | ब्रह्मगुप्त सिद्धांत. | | लल्लतंत्र. | | दामोदरीय भटतुल्य. | | सिद्धांतशिरोमणि. | ग्रहलाघव. | मन्मत. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | अं. | क. | अं. | क. | अं | क. | अं. | क. | अं. | अं. | अं. | क. |
| १ अश्विनी. | ८ | | ८ | | ८ | | ८ | ३० | ८ | ८ | ७ | ४३ |
| २ भरणी. | २० | | २० | | २० | | २१ | १५ | २० | २१ | २१ | ५१ |
| ३ कृत्तिका. | ३७ | ३० | ३७ | २८ | ३६ | | ३७ | ४५ | ३८ | ३८ | ३६ | २ |
| ४ रोहिणी. | ४९ | ३० | ४९ | २८ | ४९ | | ४९ | | ५० | ४९ | ४७ | ३७ |
| ५ मृग. | ६३ | | ६३ | | ६२ | | ६२ | | ६३ | ६२ | ६१ | २६ |
| ६ आर्द्रा. | ६७ | २० | ६७ | | ७० | | ६६ | | ६७ | ६६ | ७५ | ४३ |
| ७ पुनर्वसु. | ९३ | | ९३ | | ९२ | | ९२ | ४५ | ९३ | ९४ | ९१ | २१ |
| ८ पुष्य. | १०६ | | १०६ | | १०५ | | १०६ | | १०६ | १०६ | १०५ | ४३ |
| ९ आश्लेषा. | १०९ | | १०८ | | ११४ | | १०७ | १५ | १०८ | १०७ | १०८ | २८ |
| १० मघा. | १२९ | | १२९ | | १२८ | | १२९ | | १२९ | १२९ | १२६ | ५९ |
| ११ पू. फल्गु. | १४४ | | १४७ | | १३९ | २० | १४८ | | | १४८ | १४४ | ३१ |
| १२ उ. फल्गु. | १५५ | | १५५ | | १५४ | | १५५ | ३० | १५५ | १५५ | १५४ | १ |
| १३ हस्त. | १७० | | १७० | | १७३ | | १७० | | | १७० | १६५ | ६ |
| १४ चित्रा. | १८० | | १८३ | | १८४ | २० | १८३ | | १८३ | १८३ | १८० | |
| १५ स्वाती. | १९९ | | १९९ | | १९७ | | १९८ | ३० | १९९ | १९८ | १९३ | २८ |
| १६ विशाखा. | २१३ | | २१२ | ५ | २१२ | | २१२ | १५ | २१२ | २१२ | २०२ | ११ |
| १७ अनुराधा. | २२४ | | २२४ | ५ | २२२ | | २२४ | १५ | | २२४ | २१९ | ८ |
| १८ ज्येष्ठा. | २२९ | | २२९ | ५ | २२८ | | २२९ | ३० | २२९ | २३० | २२५ | ५९ |
| १९ मूल. | २४१ | | २४१ | | २४१ | | २४२ | | | २४२ | २४० | ४५ |
| २० पूर्वाषाढा | २५४ | | २५४ | | २५४ | | २५५ | ३० | २५४ | २५५ | २५३ | २३ |
| २१ उत्तराषाढा | २६० | | २६० | | २६७ | १० | २६० | | २६० | २६१ | २६३ | ५ |
| अभिजि. | २६६ | ४० | २६५ | | २६७ | | २५९ | ४५ | | २५८ | २५६ | १० |
| २२ श्रवण | २८० | | २७८ | | २८३ | १० | २७५ | १५ | २७८ | २७५ | २७२ | ५८ |
| २३ धनिष्ठा. | २९० | | २९० | | २९६ | २० | २८७ | ३० | २९० | २८६ | २८४ | ४७ |
| २४ शततारका | ३२० | | ३२० | | ३१३ | २० | ३२० | | ३२० | ३२० | ३१८ | ४३ |
| २५ पू. भाद्रप. | ३२६ | | ३२६ | | ३२७ | | ३२५ | | ३२६ | ३२५ | ३२२ | ३ |
| २६ उ. भाद्रप. | ३३७ | | ३३७ | | ३३५ | १० | ३३७ | | ३३७ | ३३७ | ३४० | ३५ |
| २७ रेवती. | ३५९ | ५० | ० | | ३५९ | ० | ० | | ० | ० | ३५६ | ५७ २० |
| अगस्त्य | ९० | | ८७ | | ८७ | | | | ८७ | ८० | | |
| व्याध. | ८० | | ८६ | | ८६ | | | | ८६ | ८१ | | |
| अग्नि. | ५२ | | | | | | | | ५२ | ५३ | | |
| ब्रह्मा. | ५२ | | | | | | | | ५२ | ५६ | | |
| प्रजापति. | ५७ | | | | | | | | ५७ | ६१ | | |
| अपांवत्स. | १८० | | | | | | | | | १८३ | | |
| आपस्. | १८० | | | | | | | | | | | |

## नक्षत्रयोगतारांचे कदंबाभिमुख शर.

| अनुक्रमांक. | तारा. | शरदिशा. | सूर्यसिद्धांत. | | ब्रह्मगुप्तसिद्धांत. | | द्वितीय आर्यसिद्धांत. | | सार्वभौमसिद्धांत. | | वेंकटेश बा. केतकर. | | मन्मत | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | अं. | क. | अं. | क. | अं. | क. | अं. | क. | अं. | क. | अं. | क. |
| १ | अश्विनी. | उ | ९ | ११ | ९ | ८ | १० | ० | १० | ५५ | ८ | २९ | ८ | २९ |
| २ | भरणी. | उ | ११ | ६ | ११ | ११ | १२ | ० | १२ | ५६ | १० | २६ | १० | २६ |
| ३ | कृत्तिका. | उ | ४ | ४४ | ४ | १५ | ५ | ० | ४ | ४४ | ४ | २ | ४ | २ |
| ४ | रोहिणी | द | ४ | ४९ | ४ | २८ | ५ | ० | ४ | ४० | ५ | २८ | ५ | २८ |
| ५ | मृगशीर्ष. | द | ९ | ४९ | ९ | ४८ | १० | ० | १० | १३ | १३ | २३ | १३ | २३ |
| ६ | आर्द्रा. | द | ८ | ५३ | १० | ५० | ११ | ० | ११ | ७ | १६ | ३ | ६ | ४५ |
| ७ | पुनर्वसु. | उ | ६ | ० | ६ | ० | ६ | ० | ६ | ० | ६ | ४० | ६ | ४० |
| ८ | पुष्य. | उ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ४ | ० | ४ |
| ९ | आश्रेषा. | द | ६ | ५६ | ६ | ५६ | ७ | ० | ७ | ४ | ५ | ५ | १० | ५९ |
| १० | मघा. | उ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | २८ | ० | २८ |
| ११ | पूर्वफल्गुनी. | उ | ११ | १९ | ११ | १४ | १२ | ० | १२ | ४२ | ९ | ४२ | ९ | ४२ |
| १२ | उत्तरफल्गुनी. | उ | १२ | ५ | १२ | २ | १३ | ० | १३ | ५५ | १२ | १६ | १२ | १६ |
| १३ | हस्त. | द | १० | ६ | १० | ४ | १० | ० | १२ | ४ | १२ | ११ | १२ | ११ |
| १४ | चित्रा. | द | १ | ५० | १ | ५० | २ | ० | १ | ५२ | २ | ३ | २ | ३ |
| १५ | स्वाती. | उ | ३३ | ५० | ३३ | ४१ | ३७ | ० | ४१ | ५ | ३० | ४९ | ३० | ४९ |
| १६ | विशाखा. | द | १ | २५ | १ | १८ | १ | ३० | १ | २५ | १ | ४८ | | |
| १७ | अनुराधा. | द | २ | ५२ | १ | ३९ | ३ | ० | १ | ५० | १ | ५८ | १ | ५८ |
| १८ | ज्येष्ठा. | द | ३ | ५० | ३ | २२ | ४ | ० | ३ | ३७ | ४ | ३३ | ४ | ३३ |
| १९ | मूळ. | द | ८ | ४८ | ८ | १९ | ९ | ० | ८ | ४० | ६ | ३६ | | |
| २० | पूर्वाषाढा. | द | ५ | २८ | ५ | १८ | ५ | २० | ५ | २२ | ६ | २७ | २ | ७ |
| २१ | उत्तराषाढा. | द | ४ | ५९ | ४ | ५९ | ५ | ० | ५ | १ | ३ | २७ | उ१ | २७ |
| | अभिजित्. | उ | ५९ | ५८ | ६१ | ५६ | ६३ | ० | ६२ | १४ | ६१ | ४४ | ६१ | ४४ |
| २२ | श्रवण. | उ | २९ | ५४ | २९ | ५६ | ३० | ० | ३० | ५ | २९ | १८ | २९ | १८ |
| २३ | धनिष्ठा. | उ | ३५ | ३३ | ३५ | ३२ | ३६ | ० | २६ | २५ | ३३ | २ | ३३ | २ |
| २४ | शतभिषक्. | द | ० | २८ | ० | १७ | ० | २० | ० | २० | ० | २३ | ० | २३ |
| २५ | पूर्वाभाद्रपदा. | उ | २२ | ३० | २२ | २६ | २४ | ० | २६ | ३ | १९ | २३ | १९ | २३ |
| २६ | उत्तराभाद्रपदा. | उ | २४ | १ | २३ | ५६ | २६ | ० | २८ | २८ | २५ | ४१ | १२ | ३६ |
| २७ | रेवती. | द | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | १३ | ० ३ | ३३ ४ |

## नक्षत्रयोगताऱ्यांचे कदंबाभिमुख भोग.

| अनुक्रमांक. नाव. | सूर्यसिद्धांत. | | ब्रह्मगुप्त सिद्धांत. | | द्वितीयआर्यसिद्धांत. | | सार्वभौम सिद्धांत | | वेंकटेश बा. केतकर | | मन्मत. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | अंश. | क. | अं. | क. | अं | क. | अं | क. | अं. | क. | अं. | क. |
| १ अश्विनी. | ११ | ५९ | १२ | ५ | १२ | ० | १२ | ४० | १४ | ६ | १० | ८ |
| २ भरणी. | २४ | ३५ | २४ | ४१ | २४ | २३ | २५ | ८ | २८ | २० | २४ | २२ |
| ३ कृत्तिका. | ३९ | ८ | ३८ | ५८ | ३८ | ३३ | ३९ | २ | ४० | ७ | ३६ | ९ |
| ४ रोहिणी. | ४८ | ९ | ४८ | ११ | ४७ | ३३ | ४८ | ९ | ४९ | ५५ | ४५ | ५७ |
| ५ मृगशीर्ष. | ६१ | ३ | ६१ | ० | ६१ | ३ | ६१ | १ | ६३ | ५० | ५९ | ५१ |
| ६ आर्द्रा. | ६५ | ५० | ६५ | ५ | ६८ | २३ | ६५ | ८ | ६८ | ५३ | ७५ | १६ |
| ७ पुनर्वसु. | ९२ | ५२ | ९२ | ५२ | ९२ | ५३ | ९२ | ५३ | ९३ | २२ | ८९ | २४ |
| ८ पुष्य. | १०६ | ० | १०६ | ० | १०६ | ० | १०६ | ० | १०८ | ५१ | १०४ | ५३ |
| ९ आश्लेषा. | १०९ | ५९ | १०८ | ५८ | १११ | ० | १०८ | ५६ | ११३ | ४६ | ११० | ४४ |
| १० मघा. | १२९ | ० | १२९ | ० | १२९ | ० | १२९ | ० | १२९ | ५८ | १२६ | ० |
| ११ पूर्वफल्गुनी. | १३९ | ५८ | १४२ | ४५ | १४० | २३ | १४२ | ४८ | १४३ | ३२ | १३९ | ३४ |
| १२ उत्तरफल्गुनी. | १५० | १० | १५० | ४ | १५० | २३ | १४९ | ४० | १५१ | ४५ | १४७ | ४७ |
| १३ हस्त | १७४ | २२ | १७४ | २८ | १७४ | ३ | १७५ | १३ | १७३ | ३५ | १६९ | ३७ |
| १४ चित्रा. | १८० | ४८ | १८३ | ४९ | १८२ | ५३ | १८३ | ५० | १८३ | ५८ | १८० | ० |
| १५ स्वाती | १८३ | २ | १८२ | ४१ | १८४ | ० | १८२ | २४ | १८४ | २२ | १८० | २४ |
| १६ विशाखा. | २१३ | ३१ | २१२ | ३४ | २१२ | ५३ | २१२ | ३६ | २११ | ८ | २०१ | १४ |
| १७ अनुराधा. | २२४ | ४४ | २२३ | ३३ | २२४ | ५३ | २२४ | ३८ | २२२ | ४२ | २१८ | ४४ |
| १८ ज्येष्ठा. | २३० | ७ | २३० | ४ | २३० | ३ | २३० | ५ | २२९ | ५४ | २२५ | ५६ |
| १९ मूल | २४२ | ५२ | २४२ | ४८ | २४२ | ४४ | २४२ | ३६ | २४३ | ० | २४० | ४४ |
| २० पूर्वाषाढा. | २५४ | ३९ | २५४ | ० | २५४ | ३३ | २५४ | ३४ | २५४ | ४२ | २५२ | २८ |
| २१ उत्तराषाढा | २६० | २३ | २५९ | ३७ | २६० | २३ | २६० | २१ | २६२ | ४७ | २६२ | २४ |
| अभिजित | २६४ | १० | २६० | ४६ | २६३ | ० | २६२ | १० | २६५ | २६ | २६१ | २८ |
| २२ श्रवण. | २८२ | २९ | २८० | ३ | २८० | ३ | २८० | ३ | २८१ | ५३ | २७७ | ५५ |
| २३ धनिष्ठा. | २९६ | ५ | २९६ | १५ | २९५ | ३३ | २९४ | १२ | २९७ | ३१ | २९३ | ३३ |
| २४ शततारका. | ३१९ | ५० | ३१९ | ५४ | ३१९ | ५३ | ३१९ | ५४ | ३२१ | ४२ | ३१७ | ४४ |
| २५ पूर्वाभाद्रपदा. | ३३४ | २५ | ३३४ | ४६ | ३३४ | ५३ | ३३६ | ८ | ३३४ | ४० | ३३० | ४२ |
| २६ उत्तराभाद्रप. | ३४७ | १६ | ३४७ | २९ | ३४७ | ० | ३४८ | ४४ | ३५४ | २६ | ३४५ | १९ |
| २७ रेवती. | ३५९ | ५० | ० | ० | ० | ० | ३५९ | ५० | ० | ० | ३५६/३५९ | २/१५ |

आली नाहीं, यावरूनही हे दोन श्लोक मागाहून आले असतील असें अनुमान होतें. तथापि या तारांपैकीं अपांवत्स या तारेचा उल्लेख बृहत्संहितेंत आहे.* यावरून या तीनही तारांचें ज्ञान शक ४२७ ह्या काळींही होतें. प्रजापति, अपांवत्स, आप ह्या तारा शाकल्यब्रह्मसिद्धांतांत आल्या नाहींत असें प्रो. व्हिटने ह्मणतो.† परंतु ती चूक आहे. शाकल्यब्रह्म, रोमश, आणि सोम ह्या तीनही सिद्धांतांत त्या आहेत. ग्रहलाघवांत ह्यांपैकीं आप मात्र नाहीं. शाकल्यब्रह्मसिद्धांतांत सप्तर्षींचे शरभोग आहेत. ते इतर कोणत्याही ग्रंथांत नाहींत. यंत्रराज ग्रंथांत ३२ तारांचे सायन भोगशर आहेत. सिद्धांतराज ग्रंथांत ८४ तारांचे आहेत.

नक्षत्रतारासंख्या.

कांहीं नक्षत्रांची तारा एकच आहे. कांहींच्या जास्त आहेत. अनेक आहेत त्यांपैकीं योगतारा कोणत्या दिशेची हें सूर्यादि चार सिद्धांतांत सांगितलें आहे व तें बहुधा एकसारखेंच आहे. परंतु त्यांवरून योगतारेचा बोध चांगला होत नाहीं. या चोहोंपैकीं शाकल्यब्रह्मसिद्धांतांत मात्र नक्षत्राच्या तारा किती हें सांगितलें आहे, इतरांत नाहीं. हें सांगितल्याशिवाय नुस्त्या दिशा सांगण्याचा विशेष उपयोग नाहीं. शाकल्यब्रह्मसिद्धांताशिवाय गणितग्रंथांपैकीं खंडखाद्यांत मात्र नक्षत्रयोगतारासंख्या आहेत. कांहीं संहिताग्रंथांत त्या आढळतात. नक्षत्रांच्या तारासंख्येविषयीं मतभेद आहे. पृष्ठ ४५८ यांतील कोष्टकांत निरनिराळ्या ११ ग्रंथांवरून नक्षत्रतारासंख्या दिल्या आहेत. त्यांत प्रथम तैत्तिरीय श्रुतीवरून पहिल्या भागांत सांगितल्याप्रमाणें निश्चयानें कळणाऱ्या संख्या दिल्या आहेत. नक्षत्रकल्प‡ हें अथर्ववेदाचें परिशिष्ट आहे. श्रीपतिकृत रत्नमालेचा टीकाकार माधव यानें लल्लोक्त नक्षत्रसंख्या दिल्या आहेत त्यांवरून मीं दिल्या आहेत. त्या बहुधा रत्नकोशांतून घेतल्या असाव्या.

नक्षत्रतारासंख्यांविषयीं मतभेद आहे तरी इष्ट नक्षत्रपुंज आकाशांत कोणते याविषयीं मतभेद नाहीं, असें सर्व दृष्टींनीं विचार केला असतां दिसून येतें. शतभिषक् या शब्दांतील शत शब्दावरून त्याच्या तारा १०० असा भ्रम पडला, व त्यामुळें शतभिषक् या मूळच्या नांवाबद्दल शततारा असें नांव पडलें. परंतु ही समजूत वराहमिहिरापासून आहे. तसेंच सर्वांच्या मतें रेवतीयोगताराशर शून्य आहे; भोगही शून्याजवळ आहे. तेव्हां रेवती योगतारेविषयीं मतभेद नाहीं. तिच्या आसपास मृदंगाकारांत बऱ्याच तारा आहेत. परंतु त्या ३२ च असतील असें नाहीं. परंतु ही संख्या कशावरून मानली नकळे. परंतु तीही वराहापासून आहे. बाकी सर्व नक्षत्रांचे प्रदेश आकाशांत पाहिले असतां प्रत्येकानें मानलेल्या संख्येस कांहींना कांहीं आधार आहे असें दिसून येतें. तेव्हां सर्वांच्या संख्या सयुक्तिकच आहेत.

---

* सममुत्तरेण तारा चित्रायाः कीर्त्यते ह्यपांवत्सः ॥

बृहत्संहिता, अध्याय २५ पद्य ४.

† बर्जेसचें सू. सि. भाषांतर पृ. २१८.

‡ नक्षत्रकल्प आणि वृद्धगर्गसंहिता हीं मीं प्रत्यक्ष अद्यापि पाहिलीं नाहींत. प्रो. थिबो यानें इंडि० ॲंटिक्वरि पु. १४ पृ. ४३-४५ यांत दिलेल्या माहितीवरून त्यांतल्या संख्या मीं दिल्या आहेत. प्रो. थिबोनें वृद्धगर्गसंहिता आणि खंडखाद्य यांतील मूळ वचनें दिलीं आहेत. त्याच्या लिहिण्यांत रेवती आणि अश्विनी यांसंबंधें चूक आहे ती मीं दुरुस्त केली आहे.

शर दिले आहेत. त्यांत कांहीं मीं दिलेल्यांहून भिन्न आहेत. ते असेः—भोग उत्तराभाद्रपदा ३३६; शर, मृग ५, आश्लेषा ६, मूळ ९॥. यांत बेरुणीच्या ग्रंथांत मूळचा किंवा मागच्या लेखकांचा कांहीं प्रमाद असावा. ब्रह्मगुप्तोक्त भोगशर मीं वर दिले आहेत त्यांच्या संख्या मूळच्या आर्याबद्ध आणि शब्दबद्ध आहेत, आणि त्या ब्रह्मगुप्तसिद्धांत आणि खंडखाद्य या दोन ग्रंथांत एकच आहेत. आणि त्या ग्रंथांच्या निरनिराळ्या चार प्रतींवरून त्या मीं घेतल्या आहेत. तेव्हां त्यांविषयीं संशय नाहीं. कृत्तिका, रोहिणी, चित्रा, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा यांचे शर ब्रह्मगुप्तानें यथाक्रम ५, ५, २, १॥, ३, ४ असे प्रथम सांगितले आहेत व ते बेरुणीनें दिले आहेत. परंतु यांचे शर अमुक अमुक कला कमी असें ब्रह्मगुप्तानें मागाहून लागलेंच सांगितलें आहे. त्याप्रमाणें कमी करून मीं दिले आहेत. तसें बेरुणीनें केलें नाहीं. मूळाचा शर 'अर्धनवम' सांगितला आहे. बेरुणीनें तो ९॥ दिला आहे. परंतु 'अर्धनवम' याचा अर्थ '८॥' असा होय.

वर सांप्रतच्या सूर्यसिद्धांतांतील ध्रुव दिले आहेत त्यांत आर्द्रांच्या ध्रुवाविषयीं मतभेद आहे. सूर्यसिद्धांतटीकाकार **रंगनाथ** याच्या लिहिण्यावरून दिसतें कीं आर्द्राभोग नार्मदमतें ७३।४७ आणि पर्वतमतें ७३।१० आहे, आणि सर्वजनाभिमत ध्रुव ७४।५० असेंही रंगनाथ ह्मणतो. परंतु शाकल्यसंहितोक्त आर्द्राध्रुव ६७।२० आहे ह्मणून रंगनाथानें तोच घेतला आहे.* सिद्धांततत्वविवेककार कमलाकर यानें सर्व भोगशर सूर्यसिद्धांतांतले घेतले आहेत, परंतु त्यांत आर्द्राभोग ७४।५० दिला आहे. सांप्रतचे रोमश, सोम, आणि शाकल्योक्तब्रह्म, हे सिद्धांत सूर्यसिद्धांताचे अनुयायी आहेत. त्याप्रमाणें नक्षत्रांचे भोगशर यांतही आहेत. मात्र त्यांत आर्द्राविषयीं मतभेद आहे. शाकल्यब्रह्मसिद्धांतांतले भोगशर सर्वांशीं वर दिलेल्या सूर्यसिद्धांतांतल्यांप्रमाणें आहेत. सोमसिद्धांतांत आर्द्राभोग ७४।५० आहे. बाकी सर्व भोग आणि शर वरील सूर्यसिद्धांतांतल्याप्रमाणें आहेत. रोमशसिद्धांताच्या दोन प्रती मीं मिळविल्या होत्या. त्यांत कांहीं ध्रुव सूर्यसिद्धांताहून भिन्न आहेत. परंतु लेखनप्रमादामुळें तो भेद झालेला दिसतो. एकंदरींत रोमशसिद्धांताचे ध्रुवशर सूर्यसिद्धांतांतल्याप्रमाणें आहेत असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

सूर्यसिद्धांतांत नक्षत्रयोगतारांचे भोगशर ९ श्लोकांत ( अधिकार ८. ) सांगितल्यावर पुढें ३ श्लोकांत अगस्त्य, व्याध, अग्नि, ब्रह्मा, यांचे सांगितले आहेत. पुढें लागलीच प्रजापति, अपांवत्स, आप यांचे नाहींत. मध्यें ७ श्लोकांत दुसरा विषय सांगून पुढें पुन्हा शेवटीं २० व २१ या दोन श्लोकांत प्रजापति इत्यादि तिहींचे भोगशर आहेत. यावरून ते मागाहून प्रक्षिप्त असतील असें दिसतें. नवव्या अधिकारांत अमुक तारा कधींच अस्त पावत नाहीं असें म्हटलें आहे. त्यांत ब्रह्महृदय आली आहे, त्या अर्थीं या तिहींपैकीं प्रजापति आली पाहिजे होती. कारण ब्रह्महृदयापेक्षां प्रजापतिशर ८ अंश जास्त उत्तर आहे. असें असून ती

* सांप्रतचे सूर्य, रोमश, शाकल्य ब्रह्म, सोम या सिद्धांतांत नक्षत्रध्रुव सांगितले आहेत ते त्या त्या नक्षत्रदेशाच्या आरंभापासून तारेपर्यंत जितक्या कला त्यांचे दशांश या पद्धतीनें सांगितले आहेत. सूर्यसिद्धांतांत आर्द्राभोग "अश्वयः (४)" या शब्दांनीं आहे. त्या स्थलीं "गोऽश्वयः ४३" "गोऽग्नयः ३३" असे पाठभेद आहेत.

## नक्षत्रयोगतारा.

| अनुक्रमांक. | तारानाम. | कोलब्रूक. | वेंटलि, केरोपंत. | व्हिटने, बर्जेस. | बापूदेव. | वें. बा. केतकर. | मन्मतीय. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अश्विनी. | आल्फा एरैटिस. | बीटा एरैटि. | बीटा एरै. | आल्फाएरै. | बीटाएरै. | बीटाएरैटि. |
| २ | भरणी. | म्यू किंवा ३५ एरैटिस. | ३५ एरैटिस. | ३५ एरै. | ३५ एरै. | ४१ एरैटि. | ४१ एरैटिस. |
| ३ | कृत्तिका. | ईटाटारी. | ईटाटारी. | ईटाटारी. | ईटा टारी. | ईटाटारि. | ईटाटारि. |
| ४ | रोहिणी. | आल्डिबरान | आल्डिब. | आल्डि. | आल्डि. | आल्डिब. | आल्डिबरान |
| ५ | मृग. | लांबडा ओरायन. | ११६ टारि. | लांबडाओरा | लांब. ओरा. | लांब.ओरा. | लांब.ओराय. |
| ६ | आर्द्रा. | आल्फा ओरायन. | १३३ टारि. | आल्फाओरा | आल्फाओरा | आल्फाओ. | ग्यामा जेमिनि. |
| ७ | पुनर्वसु. | पोलक्स. | पोलक्स. | पोलक्स. | पोलक्स. | पोलक्स. | पोलक्स. |
| ८ | पुष्य. | डेल्टाकांक्री | डे. कांक्री. | डे. कांक्री. | डे. कांक्री. | डे. कांक्री. | डे. कांक्री. |
| ९ | आश्लेषा. | आल्फा कांक्री. | ४९ कांक्री. | एपसिलान हैड्री. | आ. कांक्री. | आल्फा कां | झीटा हैड्री. |
| १० | मघा. | रेग्युलस. | रेग्युलस. | रेग्युलस. | रेग्युलस. | रेग्युलस. | रेग्युलस. |
| ११ | पूर्वाफल्गु. | डेल्टालियानिस. | थीटालिआनिस. | डेल्टालिओनिस. | डेल्टालिआ. | थीटालिआ. | थीटालिआनिस. |
| १२ | उत्तराफ. | डेनिवोला. | डेनिवोला. | डेनिवोला. | डेनि. | डेनिवोला. | डेनिवोला. |
| १३ | हस्त. | ग्यामा किंवा डेल्टाकार्व्हि. | डेल्टाकार्व्हि. | डेल्टाकार्व्हि. | ग्यामा किं० डे. कार्वि. | डेल्टाकार्व्हि. | डेल्टाकार्वि. |
| १४ | चित्रा. | स्पायका. | स्पायका. | स्पाय. | स्पायका. | स्पायका. | स्पायका. |
| १५ | स्वाती. | आर्कटच्यूरस. | आर्कटच्यूर. | आर्कटच्यू. | आर्कटच्यू. | आर्कटच्यूरस. | आर्कटच्यूरस. |
| १६ | विशाखा. | आल्फा किं. कपालिब्रा. | २४ लिब्रा. | २४ लिब्रा. | आल्फा किं० कपालिब्रा. | २४ लिब्रा. | आल्फा लिब्रा. |
| १७ | अनुराधा. | डेल्टास्कार्पिआन. | बीटास्कार्पि. | डेल्टास्कार्पि | डेस्टास्कार्पि | डे. स्कार्पि. | डेल्टास्कार्पि. |
| १८ | ज्येष्ठा. | अंटारिस. | अंटारिस. | अंटारि. | अंटारिस. | अंटारिस | अंटारिस. |
| १९ | मूळ. | न्यूस्कार्पि किंवा ३४स्कार्पि | ३४ स्कार्पि. | लांबडा स्का. | ३४ स्कार्पि. | ४५ ओफि. | लांबडा स्कार्पि. |
| २० | पूर्वाषाढा. | डेल्टासाजिटेरिअस | डे. साजि. | डे. साजि. | डे. साजि. | डेल्टा साजि. | लांबडा साजिटे. |
| २१ | उत्तराषा. | टोसाजिटेरि | फै साजि. | सिग्मासाजि. | टो साजि. | सिग्मासाजि. | पाय साजि. |
|  | अभिजित्. | व्हीगा | व्हीगा. | व्हीगा. | व्हीगा. | व्हीगा. | व्हीगा. |
| २२ | श्रवण. | आल्टेर. | आल्टेर. | आल्टेर. | आल्टेर. | आल्टेर. | आल्टेर. |
| २३ | धनिष्ठा. | आल्फा डे० | आल्फा डे. | बीटाडेल्फि. | आल्फाडे. | आल्फाडे. | आल्फा डे०. |
| २४ | शतभिषक्. | लांबडा आक्वेरिअस. | लांब. आक्वे. | लांब. आक्वे. | लांब. आक्वे. | लांब. आक्वे. | लांब. आक्वे. |
| २५ | पूर्वाभाद्रप. | मार्काव. | मार्काव. | मार्काव | मार्काव. | मार्काव. | मार्काव. |
| २६ | उत्तराभा. | आल्फेराट | आल्जेनिब आल्फेराट. | आल्जेनिब. आल्फेराट. | आल्फेरा. | आल्फेरा. | आल्जेनिब. |
| २७ | रेवती. | झिटापिशियम. | झिटापिशि. | झिटा.पिशि | झि. पि. | झि. पि. | झिटा किंवा म्यू पिशि. |

आमची नक्षत्रपद्धति आणि आरब लोकांची पद्धति यांची तुलना आणि आमच्या योगातारांचीं युरोपियन पद्धतीप्रमाणें नांवें आणि स्थानें यांविषयीं सविस्तर आणि चांगला विचार युरोपियन विद्वानांत कोलब्रूक यानें केला आहे. त्यापूर्वीं सर विल्य-

| अनुक्रमांक. | नक्षत्रनाम. | तैत्तिरीयश्रुति. | नक्षत्रकल्प. | वृद्धगार्गीय संहिता. | नारदसंहिता. | वराहमिहिर. | खंडखाद्यक. | लल्लकृत रत्नकोष. | शाकल्यब्रह्मसिद्धांत. | श्रीपतिकृत रत्नमाला. | मुहूर्ततत्व. | मुहूर्तचिंतामणि. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अश्विनी. | २ | २ | २ | ३ | ३ | २ | ३ | २ | ३ | ३ | ३ |
| २ | भरणी. | | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| ३ | कृत्तिका. | ७ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ |
| ४ | रोहिणी. | १ | | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| ५ | मृग. | | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| ६ | आर्द्रा. | १किं.२ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| ७ | पुनर्वसु. | २ | २ | २ | ४ | ५ | २ | ४ | २ | ४ | ४ | ४ |
| ८ | पुष्य. | १ | १ | १ | ३ | ३ | १ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| ९ | आश्लेषा. | | ६ | ६ | ५ | ६ | ६ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| १० | मघा. | | ६ | ६ | ५ | ५ | ६ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| ११ | पूर्वाफल्गुनी. | २ | २ | २ | २ | ८ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| १२ | उत्तराफल्गुनी | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| १३ | हस्त. | | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| १४ | चित्रा. | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| १५ | स्वाती. | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| १६ | विशाखा. | २ | २ | २ | २ | ५ | २ | ४ | २ | ४ | ४ | ४ |
| १७ | अनुराधा. | | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ३ | ४ | ४ | ४ |
| १८ | ज्येष्ठा. | १ | | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| १९ | मूळ. | १किं.२ | | ६ | ११ | ११ | २ | ११ | ९ | ११ | ११ | ११ |
| २० | पूर्वाषाढा. | | ४ | ४ | ४ | २ | ४ | २ | ४ | ४ | ४ | २ |
| २१ | उत्तराषाढा. | | ४ | ४ | २ | ८ | ४ | २ | ४ | ४ | ३ | २ |
| | अभिजित्. | १ | | ३ | | | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| २२ | श्रवण. | १ | ३ | ३ | | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| २३ | धनिष्ठा. | ४ | ५ | ४ | | ५ | ५ | ४ | ५ | ४ | ४ | ४ |
| २४ | शततारक्. | १ | १ | १ | १०० | १०० | १ | १०० | १०० | १०० | १०० | १०० |
| २५ | पूर्वाभाद्रपदा. | | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| २६ | उत्तराभाद्रप. | ४ | २ | २ | २ | ८ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| २७ | रेवती. | १ | १ | ४ | ३२ | ३२ | १ | ३२ | ३२ | ३२ | ३२ | ३२ |

योगतारा.

गेल्या दोन तीन शतकांत युरोपियन ज्योतिष्यांनीं डोळ्यांनीं दिसणाऱ्या बहुतेक तारांच्या यादी तयार केल्या आहेत, त्या तारांस नांवें दिलीं आहेत, आणि त्यांचे विषुवांश आणि क्रांति सूक्ष्मतः निश्चित केल्या आहेत. त्यांतून आमच्या नक्षत्रांच्या योगतारा कोणत्या याविषयीं निरनिराळ्या शोधकांचें मत पृष्ठ ४५९ यांतील कोष्टकांत दिलें आहे.

विषयीं सर्वांचें एक मत आहे. इतरांविषयीं मतभेद आहे. त्यांत कोणाचें मत बरें हें पाहण्यांत अर्थ नाहीं. कारण आमच्या ग्रंथांत जे शरभोग आहेत ते वरील कोष्टकांत दिलेल्या कोणाच्या सर्व किंवा कांहीं तारांशीं सर्वांशीं जमतात असें मुळींच नाहीं. मग आमच्या ग्रंथांतील शरभोग सूक्ष्मपणें काढलेले नसतील ह्मणून ते न जमोत किंवा ते कोणत्या कालचे हें बरोबर ठाऊक नसल्यामुळें, आणि प्राचीन कालचे शरभोग सूक्ष्मपणें काढण्याची आतां बसविलेली रीति अगदीं सूक्ष्म असेलच असें खात्रीनें ह्मणतां येत नाहीं, व त्या रीतीनें ते काढले आहेत यामुळें न जमोत. जमत नाहींत हें खरें. तेव्हां ज्या तारांचे जवळ जवळ जमतील त्या योगतारा ठरवावयाच्या. एका नक्षत्राच्या २।३ तारा असल्या तर त्यांतल्या एकीचा शर बराच जमला तर तिचा भोग जमत नाहीं, दुसरीचाच भोग जमतो, असें होतें. यामुळें कोणीं शर जमण्याकडे लक्ष्य दिलें आहे आणि कोणीं भोगाकडे दिलें आहे, कोणी योगतारांच्या दिशांकडे दिलें आहे. यामुळें प्रत्येकाच्या मतास कांहीं आधार आहेच. अमुक नक्षत्र ह्मणजे सांप्रतचा अमुक पुंज, उदाहरणार्थ, भरणी म्हणजे युरोपियनांचा मस्का, असें ठरल्यावर त्यांतील योगतारा कोणती हें वादग्रस्त राहणें साहाजिक आहे. त्या पुंजाच्या बाहेरची तारा कोणीं मानली तर तिला आधार नसेल तर मात्र ती चूक आहे. उदाहरणार्थ, मृग आणि त्याचें शीर्ष म्हणून तारकापुंज आकाशांत दिसतो किंवा मानतात. मृगशीर्षाची योगतारा मृगाच्या शीर्षस्थानीं ज्या तीन तारा आहेत त्यांतील कोणती तरी असली पाहिजे. परंतु केरोपंतांची त्याच्या बाहेर आहे. ही अर्थात चूक होय. मूळाची आकृति सर्व ग्रंथांत सिंहपुच्छासारखी सांगितली आहे. तिच्या फारच बाहेर केतकरांची मूल तारा राहते, ह्मणून ती चुकीची होय. केरोपंती ग्रहसाधन कोष्टकांत मूळाची क्रांति ३७ अंशांबद्दल चुकून २७ पडली आहे, यामुळें केतकरांची ही चूक झालेली दिसते. असो; एकंदरींत प्रत्येकाचें मत बरोबरच आहे.

तारास्थितिपत्रकें.

तारांचे वेध घेऊन त्यांचे भोगशर यांचें पत्रक ( क्याटलाग ) युरोपांत **हिपार्कस** ( इ० स० पू. १५० ) यानें प्रथम केलें. तें सांप्रत उपलब्ध नाहीं, परंतु त्यांतच अयनगतीपुरता फेरफार करून **टालमीनें** पत्रक केलें ( इ० स० १३८ ) तें सांप्रत त्याच्या सिंटाक्सिस ग्रंथांत उपलब्ध आहे. त्यांत १०२२ तारा आहेत. त्यांचे **४८ राशि** केले आहेत. यानंतर दुसरें पत्रक तैमूरलंगाचा नातु **उलुगबेग**, **समरकंद**चा बादशाहा, यानें इ० स० १४३७ मध्यें केलें. त्यांत १०१९ तारा आहेत. त्यानंतर **टैकोब्राहे** याचें पत्रक इ०स० १६०० या वर्षींचें ७७७ तारांचें आहे. त्यानंतर युरोपांत पुष्कळ सूक्ष्म पत्रकें झालीं. आमच्या देशांत वेध घेऊन असें पत्रक कोणीं केल्याचें दिसत नाहीं. **महेंद्रसूरि** ह्यानें यंत्रराज ग्रंथांत यवनागमावरून ३२ तारांचे ध्रुवक आणि शर दिले आहेत. त्या ग्रंथाचा टीकाकार मलयेंदुसूरि ह्मणतोः—

शकमतेन नक्षत्रगोले नक्षत्राणां द्वाविंशत्यधिकसहस्रं १०२२ मुक्तमस्ति। तन्मध्ये ग्रंथकारेण यावनं नक्षत्रगोलं सम्यग् बुध्वा यंत्रोपयोगीनि द्वात्रिंशत् नक्षत्राणि गृहीतानि।

अध्याय १ श्लोक २१-३८ टीका.

यांत लिहिलेलें नक्षत्रपत्रक, त्यांतील १०२२ ह्या नक्षत्रसंख्येवरून आणि ग्रंथकार

म जोन्स यानें केला आहे ( इ०स० १७९० ), परंतु तो अपुरता आहे. कोलब्रूकचा याविषयीं निबंध एशियाटिक रिसर्चेस पु. ९ सन १८०७ यांत छापला आहे. त्यावरून कोलब्रूक यास संमत असलेल्या तारा वरील कोष्टकांत दिल्या आहेत. इतरांच्या शोधास कोलब्रूकच्या प्रयत्नाचा मोठा उपयोग झाला. बेंटली यानें केलेलें A Historical view of Indian Astronomy ह्या नांवाचें पुस्तक इ. १८२३ मध्यें कलकत्ता एथें छापलें आहे, त्यांत त्यानें ब्रह्मगुप्तोक्त शरभोगांवरून तारांचा विचार केला आहे. त्यावरून वरील कोष्टकांतल्या त्याच्या मताच्या योगतारा दिल्या आहेत. त्यांत उत्तराभाद्रपदांची तारा त्यानें अल्जेनिब मात्र दिली आहे. केरोपंतांनीं ती न घेतां आल्फेराट दिली आहे. हीशिवाय केरोपंतांनीं सर्व तारा बेंटलीच्याच घेतल्या आहेत.* वर दिलेल्यांशिवाय बेंटलीनें विकल्पानें कांहीं दुसऱ्या तारा दिल्या आहेत त्या अशाः—अश्विनी ग्यामा एरिस; मृग ११३, ११७ टारी; आश्लेषा ५० कांक्री; पूर्वफल्गुनी ७१ लिओ; हस्त ८ कार्व्ही; मूल ३५ स्कार्पिओ. व्हिटने यानें या विषयाचा फार सविस्तर विचार केला आहे† आणि योगतारा पुष्कळ विचार करून ठरविल्या आहेत. बापूदेव यांनीं आपल्या सूर्यसिद्धांताच्या इंग्लिश भाषांतरांत योगतारा दिल्या आहेत‡ त्यांवरून वरील कोष्टकांत दिल्या आहेत. त्या§ सर्व कोलब्रूकला अनुसरून आहेत. परंतु आपल्या पंचांगांत त्यांनीं ७ तारांत फरक केला आहे. ह्मणजे अश्विनी, आश्लेषा, विशाखा, मूल, उत्तराषाढा, धनिष्ठा, उत्तराभाद्रपदा यांच्या पहिल्या तारा सोडून त्यांबद्दल बीटा एरिटीस, एप्सिलान हैड्री, २४ (आयोटा) लिब्रा, लांबडा स्कार्पि, सिग्मासाजिटेरि, बीटा डेल्फिनी, ग्यामा पिगासी, ह्या तारा घेतात. आणि हा सर्व फेरफार व्हिटनेच्या मतास अनुसरून आहे हें सहज दिसतें. वेंकटेश बापूजी केतकर यांनीं त्यांच्या मतें ज्या योगतारा त्या मला कळविल्या त्यावरून त्या दिल्या आहेत. कोलब्रूक इत्यादिकांनीं मानिलेल्या योगतारांचे शरभोग आमच्या ग्रंथांतल्या योगतारांच्या शरभोगांशीं मिळतील तितके मिळविण्याकडे त्यांनीं लक्ष दिलें आहे; परंतु मीं ती गोष्ट व योगतारांमध्यें १३ अं० २० कला याच्या जवळ जवळ अंतर असावें व नैर्ऋत्य करून त्या आपापल्या विभागांत असाव्या या दोहोंकडे मुख्यत्वें लक्ष दिलें आहे. आर्द्रा नक्षत्राची तारा मृगपुंजांतली मानणें ठीक नाहीं.

आर्द्रया रुद्रः प्रथमान एति ॥

तै० ब्रा० ३.१.१.

या वाक्यांत आर्द्रेबरोबर रुद्र येतो असें आहे. व्याधतारा हा रुद्र होय. मीं मानिलेली आर्द्रा व्याधाच्या अगोदर फक्त ९ मिनिटें मध्यान्हीं येते. तिजहून व्याधाला जवळ अशी तेजस्वी तारा त्या प्रदेशांत दुसरी नाहीं.

वरील कोष्टकावरून दिसेल कीं कृत्तिका, रोहिणी, पुनर्वसु, पुष्य, मघा, उत्तराफल्गुनी, चित्रा, स्वाती, ज्येष्ठा, अभिजित, श्रवण, शतभिषक्, पूर्वाभाद्रपदा, रेवती, या १४ तारां-

---

* ग्रहसाधन कोष्टकें पृ. ३२४।५.

† सू. सि. भाषांतर पृ. १७५-२२०.

‡ बिब्लिओथिका इंडिका न्यू सिरीस, सन १८६०. यांत त्यांनीं भरणीबद्दल मस्का ह्मटलें आहे. परंतु पंचांगांत ते त्यापैकीं ३५ एरीटिस घेतात ह्मणून तीच मीं दिली आहे.

§ छापतांना कृत्तिकातारा ईटा टारीबद्दल पी टारी चुकून पडली असें दिसतें.

आहे, यावरून वरील " खौ " इत्यादि वचनें आणि पूर्वोक्त वैदिकास माहित असलेलीं नक्षत्रें गणेश दैवज्ञापासून परंपरेनें आलीं असावीं असें दिसतें.*

नक्षत्रपद्धतीचें मूळ.

चिनी, पार्शी आणि अरब या लोकांत नक्षत्रपद्धति होती. तर नक्षत्रपद्धति हिंदुलोकांनीं स्वतंत्रपणें काढली कीं दुसऱ्या राष्ट्रापासून घेतली अशी शंका घेऊन तिला युरोपियन विद्वान् बरेंच महत्व देतात. परंतु तितकें या गोष्टीचें महत्व मला वाटत नाहीं. कारण, संपूर्ण ज्योतिषगणितपद्धति भारतीयांनीं स्वतंत्रपणें काढली कीं दुसऱ्यापासून घेतली या महत्वाच्या गोष्टीचा निर्णय केवळ नक्षत्रपद्धति मूळची कोणाची या निर्णयावर विशेष अवलंबून नाहीं. आज नक्षत्रज्ञान झालें कीं उद्यां ग्रहज्ञान झालेंच पाहिजे, एका राष्ट्रानें नक्षत्रपद्धति स्थापिली तर ग्रहगतिपद्धति त्यानेंच स्थापिली पाहिजे, किंवा एकानें नक्षत्रपद्धति दुसऱ्यापासून घेतली तर त्या घेणारास ग्रहपद्धति स्वतंत्रपणें समजणार नाहीं, असें कांहीं नाहीं. नक्षत्रपद्धति मूळची हिंदूंची नव्हे असें **वेबर** नामक जर्मन विद्वान् ह्मणतो. ती **चिनी** लोकांनीं स्थापिली व त्यांपासून हिंदूंनीं घेतली असें एम् **बायो** नामक फ्रेंच विद्वान् आग्रहानें प्रतिपादितो, आणि तदनुसार **व्हिटने**ही ह्मणतो कीं ती मूळची हिंदूंची नव्हे. परंतु **चिनी**लोकांचें नक्षत्रज्ञान आरंभीं जें होतें त्याहून जास्त ज्ञान ज्योतिषाचें त्यांस झालें नाहीं, ग्रहगति आणि अयनचलन या महत्वाच्या गोष्टींचा त्यांनीं मुळींच विचार केला नाहीं, असें **बायो** आणि **व्हिटने** कबूल करितात.† आमच्या लोकांनीं नक्षत्रपद्धति स्वतंत्रपणें स्थापिली आहे. चिनीलोकांनीं स्वतंत्रपणें आपली काढली असेल; परंतु आमच्या लोकांनीं ती त्यांजपासून घेतली नाहीं हें खचित. यावद्दल विवेचन मागें ( पृ० १२९ ) केलेंच आहे. एथें विस्तर करण्याचें कारण नाहीं. परंतु युरोपियनांचें ह्मणणें थोडक्यांत पाहूं. चिनीलोकांच्या केवळ नक्षत्रपद्धतीचा आणि तत्संबंधें हिंदु नक्षत्रपद्धतीचा सविस्तर विचार **बायो** ह्यानें इ.स.१८४०, १८४५ व १८५९ मध्यें एका फ्रेंच ‡मासिक पुस्तकांत केला आहे. त्याच्या ह्मणण्याचें तात्पर्य असें आहे कीं, " चिनीलोकांचीं वेधयंत्रें व वेधपद्धति चांगली होती आणि त्यांचें सांप्रतच्या युरोपियन पद्धतीशीं साम्य आहे. त्यांजपाशीं याम्योत्तरलंघनयंत्र आणि कालसाधनार्थ घटिका ( Clepsydra ) होती. त्यांनीं तार.च्या याम्योत्तरलंघनवेधावरून त्यांचे विषुवांश आणि क्रांति ठरविली होती, आणि त्याकरतां व वेधांत कालसंबंधें चूक पडेल तर दुरुस्त करण्याकरितां विषुववृत्ताच्या आसपासच्या २४ तारा त्यांनीं इ० स० पूर्वी २३५७ च्या §सुमारास ठर-

---

* त्या वैदिकानें नक्षत्रें मला दाखविलीं, त्यांत रेवती आणि विशाखा हीं चुकलीं होतीं. त्यांत रेवती नक्षत्र जें दाखविलें तेंच ज. वा. मोडकांस रत्नागिरी एथील एका चांगल्या जोश्यानें दाखविलें होतें. धुळें एथील एका चांगल्या जोश्याच्या मतेंही रेवती नक्षत्र तेंच होतें. परस्परांशीं संबंध नाहीं अशा तीन ठिकाणीं ही चुकी कशी शिरली न कळे. परंतु ती गणेशाची असण्याचा संभव नाहीं. माझ्या ज्योतिर्विलास पुस्तकांत नक्षत्रांचें वर्णन आहे, त्यावरून कोणाच्या मदतीवांचूनही नक्षत्रांची ओळख करून घेतां येईल.

† या कलमांत बायो आणि व्हिटने यांचें ह्मणणें दिलें आहे तें बर्जेसचें सूर्यसिद्धांताचें भाषांतर पृ. १८०, २०० पासून २०९ व २२४ यांतलें आहे.

‡ Journal des savants.

§ हा काल त्या तारांचा आरंभ कृत्तिकांपासून आहे यावरून गणितानें काढिलेला आहे; चिनी ग्रंथांत दिलेला नाहीं.

अर्थात् टीकाकार यांच्या कालावरून (पृ. ३५१ पहा.) टालमीचें होय. यावरून मुसलमानांच्या द्वारें तें या देशांत आलें होतें असें दिसतें. परंतु त्याचा पुढें प्रसार किंवा उपयोग झाल्याचें दिसत नाहीं.

नक्षत्रांची ओळख.

शोधित नक्षत्रांच्या योगतारा राहोत, परंतु सर्व नक्षत्रें तरी दाखविणारे जोशी बहुधा आढळत नाहींत. कोलब्रूक ह्मणतो कीं, नक्षत्रांपैकीं कांहीं नक्षत्रें हिंदु ज्योतिष्यांनीं आह्मांस दाखविलीं; परंतु कांहीं त्यांस दाखवितां आलीं नाहींत. बेरुणी ह्मणतो* कीं "या कामीं मीं फार परिश्रम केले. परंतु नक्षत्रांच्या योगतारा डोळ्यांनीं पाहून आकाशांत बोटानें दाखविणारा एकही ज्योतिषी मला आढळला नाहीं." सांप्रतही योगतारा दाखविणारा जोशी क्वचित आढळेल. पुष्कळ जोशी असे आहेत कीं त्यांस सामान्यतः नुसतीं नक्षत्रेंही दाखवितां येत नाहींत. पत्रिका करण्यांत व मुहूर्त पाहण्यांत चांगला निपुण परंतु आकाशांत अश्विन्यादि नक्षत्रें क्रमानें पश्चिमेकडून पूर्वेकडे आहेत असें ज्यास माहित नाहीं, तीं पूर्वेकडून पश्चिमेकडे आहेत अशी ज्याची समजूत, असा एक जोशी मला आढळला होता. तथापि बहुतेक नक्षत्रें दाखविणारे कांहीं लोक आढळतात. कुलाबा जिल्ह्यांतील चौल एथील फफे उपनांवाचा एक वैदिक ब्राह्मण मला भेटला होता, त्यास सगळीं नक्षत्रें ठाऊक होतीं. त्यानें मध्यान्हवृत्तावर कोणतें नक्षत्र आलें आहे तें पाहून त्यावरून रात्रिमान काढण्याचा एक श्लोक मला सांगितला, तो फार उपयोगी आहे ह्मणून एथे देतों:—

| सौ | ख | जा | श्री | गु | चु | गै | चो | छो | भू १ युक् ॥ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १०२ | ११२ | १२८ | १४० | १५३ | १५६ | १८३ | १९६ | १९७ | |

| छ | खि | श्री | कु | चू | छे | को | द्वि २ युक् ॥ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २१७ | २३२ | २४० | २५१ | २६६ | २७७ | २९१ | |

| डौ | ख | छा | डी | कु | धु | त्रि ३ युक् ॥ | ख | जा | कु | चू | घे | धो |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३०५ | ३१२ | ३२७ | ३४५ | ३५१ | ३५४ | | १२ | २८ | ५१ | ६६ | ७४ | ९४ |

अश्विनी नक्षत्र मध्यान्हवृत्तावर असतां त्या वेळीं १०२ अंश हें लग्न असतें (कर्कलग्नाचे १२ अंश झाले असतात), याप्रमाणें २८ नक्षत्रांच्या प्राग्लग्नाचे अंश यांत आहेत. लग्नावरून इष्टकाल आणण्याच्या रीतीनें काल आणावा. या वचनांत द्वितीयार्यसिद्धांतांतला (पृ. २३२) कटपयादि वर्णांचा संख्यासंकेत असून आणखी अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, हे स्वर १ पासून ९ पर्यंत अंक आणि ० यांचे वाचक असा संकेत आहे. या वचनांच्याच अर्थाचे गणेशदैवज्ञकृत तीन श्लोक मुहूर्तसिंधु ग्रंथांत दिले आहेत.† त्यांत अंशांच्या संख्या नेहमींच्या पद्धतीनें आहेत, आणि ४ पलभा जेथें असेल तेथचे हे लग्नांश, इतरत्र कांहीं कमजास्त होतात असें सांगितलें आहे. यावरून आणि चौलगांव गणेशदैवज्ञाच्या नांदगांवापासून जवळचा

* India, II. p. 83.

† त्यांत चित्रांचे अंश २६३ आणि शततारकांचे ९१ आहेत. वरील वचनांत या ठिकाणीं भू आणि कू अशीं अक्षरें आहेत तीं गू आणि कू असतील तर दोहोंचा मेळ पडेल.

असावा." खाल्डियन लोकांत नक्षत्रपद्धति होती कीं काय याविषयीं तो म्हणतो कीं, " वेबर म्हणतो कीं बायबलांतील मझलाथ (Mazzaloth) आणि मझराथ (Mazzaroth) हे शब्द (जाब ३८.३२, राजे २३.५) आरब लोकांच्या नक्षत्रवाचक मंझिल (Manzil) शब्दाशीं सदृश आहेत. यावरून पाश्चात्य सेमिटिक लोकांत नक्षत्रपद्धति असावी, आणि ती खाल्डियन लोकांनीं काढली असावी. परंतु पूर्वोक्त उल्लेख इतका अप्रसिद्ध आणि संशयित आहे कीं, तो त्या पद्धतीच्या अस्तित्वाबद्दल प्रमाण मानतां येत नाहीं. आणखी असें कीं, ती पद्धति इतक्या प्राचीनकालीं इतक्या पश्चिमेस त्यांत विशेषतः खाल्डियन ज्योतिःशास्त्रांत असेल तर ग्रीक लोक तिजविषयीं कांहींच सांगत नाहींत, ह्मणून या गोष्टीवर भरंवसाच बसत नाहीं." तेव्हां ज्या सेमिटिक किंवा इराणी लोकांच्या द्वारें चिनी पद्धति हिंदुस्थानांत आली असें व्हिटने ह्मणतो, ते खाल्डियन किंवा पार्शी नव्हत. आणि दुसऱ्या कोणा सेमिटिक किंवा इराणी लोकांत नक्षत्रपद्धति प्राचीन कालीं होती व आतांपर्यंत चालत आली आहे असें प्रसिद्ध नाहीं. तेव्हां व्हिटनेनें आणलेले मध्यस्थ सेमिटिक किंवा इराणी यांचा सांप्रत मागमूसही नाहीं असें त्याच्याच तोंडून झालें.

इ. स. पूर्वी ११०० पर्यंत चिनी पद्धतींत २४ मात्र तारा होत्या. यामुळें त्यापूर्वीं चिनी पद्धति हिंदुस्थानांत आली असें व्हिटने आणि बायो यांस ह्मणतांच येत नाहीं. हिंदु पद्धतींत अभिजित् नक्षत्र होतें तें इ. स. ९७२ मध्यें कमी झालें असें बायो ह्मणतो. ह्मणेज तोंपर्यंत २८ नक्षत्रांची चिनी पद्धति चालू होती असें तो दर्शवितो. परंतु त्याच्यापूर्वीं पुष्कळ काळ हिंदूंनीं गणितांत २७ नक्षत्रें घेतलीं आहेत आणि तैत्तिरीय संहितेंत २७ मात्र नक्षत्रें आहेत असें दाखवून व्हिटनेनेंच परभारें बायोचें खंडन केलें आहे. असो; या सर्व विवेचनावरून आमच्या लोकांनीं नक्षत्रपद्धति चिनीलोकांपासून घेतली हें बायो आणि व्हिटने यांचें ह्मणणें अगदीं त्याज्य होय. वेबरही ह्मणतो कीं, " हिंदूंनीं नक्षत्रपद्धति चिनीलोकांपासून घेतली हें ह्मणणें मान्य करतां येत नाहीं.* "

सर विल्यम जोन्स यानें आरबी आणि हिंदु नक्षत्रपद्धतींची तुलना केली† आहे. परंतु " ती अपुरती आणि स्थूल आहे, आणि तीवरून काढलेलीं अनुमानें विश्वसनीय किंवा महत्वाचीं नाहींत " असें व्हिटने ह्मणतो.‡ आणि जोन्सनें ती तुलना केवळ नक्षत्रांसंबंधें केलेली नाहीं; नक्षत्रराशींसंबंधें केलेली आहे. आणि त्याचें मत हिंदुलोकांनीं नक्षत्रराशिपद्धति ग्रीक लोकांपासून घेतली नाहीं, खाल्डियन् लोकांपासून घेतली असें आहे. खाल्डियन लोकांत नक्षत्रपद्धति नव्हती असें व्हिटनेचें मत वर दिलेंच आहे. आरब आणि हिंदु यांच्या नक्षत्रराशिपद्धतींची तुलना कोलब्रूकनें बरीच सविस्तर केली§ आहे. परंतु आरबांपासून हिंदूंनीं ती पद्धत घेतली असें त्याचेंही मत नाहीं व दुसरे कोणाचेंही नाहीं.

---

* History of Indian Literature, p. 247.

† एशियाटिक रिसर्चेस पु. २ इ. स. १७९०.

‡ सू. सि. भा. पृ. १८०.

§ एशि. रिस. पु. ९ इ. स. १८०७

दिसत नसे. त्या दर्शविण्यांत त्यांचें विषुववृत्ताशीं सान्निध्य या गोष्टीकडे मुख्य लक्ष दिलें होतें; मग त्या फार तेजस्वी असोत किंवा नसोत, दिसल्या म्हणजे झा-ल्या. त्या नक्षत्रांस सिउ ( Siu ) म्हणतात. त्या चोविसांत मागाहून मघा, विशा-खा, श्रवण आणि भरणी यांतील चार तारा च्यूकांग या राजाचे वेळीं इ० स० पूर्वी ११०० चे सुमारास जोडल्या." बायो याच्या विवेचनांत चिनी नक्षत्रांचा जितका विचार आहे तितका हिंदूच्यांचा नाहीं. व्हिटनेनें चिनी, आरबी आणि हिंदु या तिनही पद्धतींचें सविस्तर विवेचन करून तुलना केली आहे.तीनही पद्धतींत कांहीं गोष्टींचें साम्य आहे, कांहींचें वैषम्य आहे. यामुळें व्हिटने त्यास स्वतः असें अनुमान काढणें भाग पडलें कीं "तिहींमध्यें एकही नक्षत्रपद्धति अशी नाहीं कीं जी इतर दोहोंपैकीं कोणतीचेंही साक्षात् मूळ मानिता येईल." असें असूनही पुढें तो ह्मणतो कीं "इ० स० पूर्वी ११०० सुमारास किंवा त्यानंतर लवकरच चिनी नक्षत्रपद्धति पश्चिम एशियांत गेली. तेथें सेमिटिक अथवा इराणी या दोन राष्ट्रांपैकीं कोणी तरी ती स्वीकारिली. त्यांणीं तींत, कमी कुशलतेच्या आणि चांगल्या शास्त्रीय पद्धतीस विशेष अनुसरून नाहीं अशा वेधपद्धतीस उपयोगी असा फेर केला.तो असा कीं क्रांतिवृत्ताच्या प्रदेशांतील प्रदर्शनास अनुसरून त्यांनीं चिनी 'सू' ही एक तारा होती त्याबद्दल पुंज कल्पिले आणि कांहींचीं स्थानें बदललीं. आणि अशा स्थितींत ती पद्धति आणि तिजबरोबरच बहुधा ग्रहांचें ज्ञान हिंदुस्थानांत आलें आणि त्याच सेमिटिक आणि इराणी लोकांपासून ती नक्षत्रपद्धति शेवटीं आरबांनीं घेतली." आह्मां भारतीयांची नक्षत्रपद्धति केवळ दृष्टिवेधानें सिद्ध झालेली आहे, आणि चिनी लोकांची यंत्रवेधाकरतां सिद्ध केलेली आहे. आमच्या नक्षत्रांपैकीं रोहिणी, पुनर्वसु, मघा, पूर्वोत्तर फल्गुनी, स्वाती, अनुराधा, ज्येष्ठा, मूल, अभिजित्, श्रवण, यांच्या योगतारा चांगल्या ठळक ह्मणजे पहिल्या किंवा दुसऱ्या (क्वचित् तिसऱ्या) प्रतीच्या आहेत; परंतु चिनीलोकांनीं त्या न घेतां त्या नक्षत्रांच्या तारा दुसऱ्याच अगदीं कमी तेजस्वी स्वीकारल्या आहेत.* कारण त्या त्यांस वेधोपयोगी होत्या. सारांश भारती पद्धति नैसर्गिक आहे; चिनी पद्धति कृत्रिम आहे. असें असून, चिनीलोकांपासून हिंदूंनीं नक्षत्रपद्धति साक्षात् घेतली असें ह्मणतां येईना, तेव्हां ज्या इराणी किंवा सेमिटिक लोकांच्या नक्षत्रपद्धतीचा सांप्रत मागमूसही नाहीं, अशा कोणत्या तरी सेमिटिक किंवा इराणी लोकांच्या हातीं चिनी पद्धति देऊन, आणि तेथें तिला अधिक अडाणी रूप घ्यावयास लावून, ह्मणजे सृष्टिक्रमां-तील सुधारणाक्रमाचा विपर्यास करण्यास लावून, त्यांच्या द्वारें व्हिटनेनें ती पद्धति हिंदुस्थानांत आणिली. यावरून व्हिटनेच्या ह्मणण्याची योग्यता दिसून येईल. पार्शी लोकांत नक्षत्रपद्धति होती; परंतु तिजविषयीं व्हिटनेच ह्मणतो कीं, "झेंदावेस्ता ग्रंथांत ती अद्यापि कोणीं दाखविली नाहीं. बुंदेहेश नामक ग्रंथाच्या दुसऱ्या भा-गांत नक्षत्रांची संख्या ( २८ ) आणि त्यांचीं नावें मात्र आहेत. याहून तिजविषयीं ज्यास्त माहिती कांहीं नाहीं. आणि तो ग्रंथही फार प्राचीन नाहीं. सासनिअन बादशहांच्या कारकीर्दींत इराण देश स्वतंत्र झाला त्यावेळचा (इ. सनाच्या

---

* बर्जेस सू. सि. भा. पृ. ३२४ पहा.

# २ संहितास्कंध.

ज्योतिषाच्या सर्व शाखांचें ज्यांत विवेचन आहे त्यास **संहिता** असें ह्मणत असत. परंतु **वराहमिहिराच्या** वेळीं तें लक्षण फिरलें होतें. गणित आणि होरा यांखेरीज तिसऱ्या शाखेस त्यावेळीं **संहिता** ह्मणत असत. पुढें लवकरच वराहसंहितेंत जे विषय आले आहेत त्यांच्या विचाराचा लोप होऊन मुहूर्तग्रंथ हाच तिसरा स्कंध झाला. ह्याविषयीं विचार पुढें करूं. प्रथम वराहाच्या संहितेंत काय विषय आहेत ते सांगतों. ह्मणजे संहिता या शाखेचें स्वरूप लक्षांत येईल. ते विषय असेः-रवि, चंद्र, राहु आणि इतर ग्रह आणि केतु यांचे चार ( गमन ) आणि त्यांचीं फलें ह्मणजे नक्षत्रमंडलांतून होणाऱ्या त्यांच्या गमनापासून जगतास होणारीं शुभाशुभ फलें यांचें कथन; अगस्ति, सप्तर्षि यांच्या उदयादिकांचीं फलें; इतके विषय पहिल्या १३ अध्यायांत आहेत. १४ वा कूर्माध्याय ह्मणून आहे. त्यांत **भरतखंडाचे** निरनिराळे ९ विभाग कल्पून त्यांतले देश आणि त्या त्या विभागांवर अमुक नक्षत्रांचें आधिपत्य इत्यादि सांगितलें आहे. पुढें नक्षत्रव्यूह आणि ग्रहांचीं युद्धें आणि समागम यांचीं फलें आहेत. संहितेंत व्यक्तिविषयक फलें नसतात; राष्ट्रास होणारीं शुभाशुभ फलें सांगितलीं असतात; हें पूर्वी सांगितलेंच आहे. पुढें वर्षफल विचार आहे. तो कांहीं अंशीं सांप्रत पंचांगांत संवत्सरफल असतें तशा प्रकारचा आहे. पुढें ग्रहशृंगाटक प्रकरण आहे. त्यांत रवीजवळ किंवा एखाद्या नक्षत्राजवळ सर्व किंवा कांहीं ग्रह एका कालीं धनु, शृंग इत्यादि आकारांनीं दिसले तर त्याचीं फलें आहेत. पुढें पर्जन्यगर्भलक्षण, गर्भधारण, वर्षण हे विषय आहेत. त्यांत मार्गशीर्षादि मासांत पर्जन्याचें गर्भधारण व त्यावरून पर्जन्यवृष्टि कशी होईल इत्यादि विवेचन आहे. या विषयाचा सांप्रतही कांहीं लोक विचार करतात, व गर्भधारणावरून वृष्टि कशी होईल हें बिनचुक सांगणारे कांहीं लोक आढळतात, असें ह्मणतात. या प्रकरणांत पर्जन्य पडलेला मोजावा असें सांगून तो मोजण्याची रीती सांगितली आहे. पुढें रोहिणी, स्वाती, अषाढा, भाद्रपदा, यांचा चंद्राशीं योग होतो त्याचीं फलें आहेत. पुढें सद्योवर्षण, कुसुमफललक्षण, पुढें संध्या ( प्रातः सायंकाळीं आकाशांत दिसणारी रक्तिमा इत्यादिक ) दिग्दाह, भूकंप, उल्का, परिवेष ( खळें ), इंद्रधनुष्य, गंधर्वनगर* ( आकाशांत दिसणारें नगर ), प्रतिसूर्य, निर्घात, हे सृष्टचमत्कार आहेत. पुढें धान्यादिकांचें मूल्य, इंद्रध्वज, नीराजन हे विषय आहेत. पुढें खंजननामक पक्षाच्या दर्शनादिकांचीं फलें सांगितलीं आहेत. पुढें दिव्य, आंतरिक्ष आणि भौम असे तीन प्रकारचे उत्पात वर्णिले आहेत. पुढें मयूरचित्रकप्रकरण आहे. पुढें मुख्यतः राजांच्या उपयोगी असे पुष्यस्नान, पट्ट ( मुकुट ) लक्षण, खड्गलक्षण, हे विषय आहेत. पुढें वास्तुप-

* न्यूहालंडपासून कांहीं मैलांवर समुद्रांतल्या एका गलबतावरील लोकांस न्यूहालंडमधील एक नगर आकाशांत दिसलें असें वर्तमान इ. स. १८८७ च्या सुमारास छापलें होतें. यावरून गंधर्वनगर हा विषय अगदीं खोटा नव्हे असें वाटतें.

हिंदुस्थान आपल्यांनीं ही घेतली असें कोलब्रुक म्हणतो* व मागें पृ. ३०९।१० यांत [illegible] हें उघड आहे. माक्समूलर ह्मणतो कीं, बाबिलोनिया [illegible] नक्षत्रपद्धति सर्वथा घेतली. वेबर म्हणतो‡ कीं ती हिंदूंनीं बाबिलोनियन किंवा खाल्डिअन लोकांपासून घेतली. परंतु माक्समुलरनें सप्रमाण सविस्तर विचार केलेला नाहीं. आणि हे दोघांचें मत ग्राह्य नाहीं असें व्हिटनेचें मत वर दिलेंच§ आहे. मागें पृ. [illegible] व पुढें पृ. १२९ मध्यें दर्शविलेल्या विचारांवरून आमच्या लोकांनीं नक्षत्रपद्धति स्वतंत्रपणें स्थापिली हें निःसंशय सिद्ध होतें.

## ( ११ ) महापात.

चंद्रसूर्यांच्या क्रांतिसाम्यास महापात ह्मणतात. सायन रविचंद्रांचा योग ६ व १२ राशि होतो. त्या सुमारास क्रांतिसाम्य होतें. पहिल्यास व्यतिपात आणि दुसऱ्यास वैधृति ह्मणतात. हें क्रांतिसाम्य असतें तेव्हां शुभकर्मे वर्ज्य आहेत. यामुळें सर्व गणितग्रंथांत याचें गणित असतें. गणेशदैवज्ञानें ग्रहलाघवांत याचें गणित देऊन शिवाय सुलभ रीतीनें त्याची वेळा काढण्याकरितां पातसारणी ह्मणून एक स्वतंत्र लहानसा ग्रंथ केला आहे.

येथवर गणितस्कंधाचा विचार झाला. आतां इतर स्कंधांचा विचार करूं.

---

* Algebra Intro. p. XXII.

† ऋग्वेद पु. ४ प्रस्तावना.

‡ History of Indian Literature p. 2 No te2, and p. 247.

§ *मोनियर विल्यम्स यानें नक्षत्रपद्धति मूळची हिंदूंची असें प्रथम ह्मटलें आहे, परंतु पुढें व्हिटनेच्या विचारापुढें दिपून जाऊन त्याचें मत देऊन त्यास मान्यता दाखविली आहे.* ( Indian Wisdom p. 183 and Note 2. ). यांत स्वतः विचार करण्याचें सामर्थ्य नाहीं असें मात्र त्यानें दाखविलें आहे.

म्हणून मतें दिलीं आहेत. उदकार्गलप्रकरण **सारस्वत** मुनीनें सांगितलेलें प्रथम सांगून नंतर " मानवं वक्ष्ये ( मनुष्यांचें सांगतों ) " असें म्हणून बरीच माहिती सांगितली आहे. वाराही संहितेंतील विषयांचा शोध पुढेंही चालू रहाता तर पुष्कळ उपयोग झाला असता. याविषयीं पूर्वी ( पृ. २१६ ) सांगितलेंच आहे. वाराही संहितेंतील सर्व किंवा बहुतेक विषयांचें ज्या एकाच ग्रंथांत किंवा निरनिराळ्या ग्रंथांत विवेचन आहे असे ग्रंथ पुढें मुळींच झाले नाहींत. मुहूर्ततत्व ग्रंथांत संक्षेपानें बहुतेक विषय आले आहेत, व ज्योतिषदर्पण ग्रंथांत ग्रहचार आहे, परंतु वराहानंतर ते विषय मुळींच लोपले असें म्हणण्यास हरकत नाहीं. गर्भावळी ( पर्जन्यगर्भ ) वगैरे दोन तीन प्रकरणांवर स्फुट विचार कांहीं ग्रंथांत व किरकोळ प्रकरणांत आढळतात व त्यांचा विचार अद्यापि कोणी करितात. परंतु त्यांत महत्वाचे फारच थोडे असतात. वास्तुप्रकरण सांप्रतच्या सर्व मुहूर्तग्रंथांत असतें. त्यांत कांहीं उपयुक्त गोष्टी आहेत; तथापि मूळच्या हेतूचें बहुतेक विस्मरण झालें आहे. व ज्या रीतीनें तें प्रकरण सांप्रतच्या ग्रंथांत आहे त्या रीतीनेंही त्याचा सांप्रत घरें बांधण्यांत फारसे कोणी विचार करीत नाहींत. घराच्या लांबी रुंदीची बेरीज इत्यादिकांस अमुक संख्येनें भागून अमुक बाकी राहील तर शुभ, अमुक राहिल तर अशुभ, अशा प्रकारचे नियम* कोण पहातो ! परंतु याबरोबर उपयुक्त गोष्टींचाही विचार कोणी करीत नाहीं.

मुहूर्तग्रंथ.

गर्भाधानादि संस्कार, प्रयाण, व दुसरीं व्यवहारांतील अनेक प्रकारचीं कृत्यं अमुक वेळीं केलीं असतां तीं लाभप्रद होतात, अशाविषयीं कांहीं नियम कल्पिले आहेत. आणि त्याप्रमाणें निश्चित केलेल्या वेळेला **मुहूर्त** अशी पारिभाषिक संज्ञा पडली आहे. अशा मुहूर्तांचा विचार हें एक पूर्वी संहिताग्रंथांचें अंग असे; परंतु पुढें संहितांतील याखेरीज इतर विषयांचा लोप होऊन मुहूर्त या अंगाचें प्राधान्य झालें. आणि पुढें मुहूर्तविषयक ग्रंथास मुहूर्तग्रंथ असेंच ह्मणूं लागले. मुहूर्तग्रंथांतले विषय सामान्यतः असे असतातः—त्याज्य-

त्यांतले विषय.

प्रकरण ह्मणून एक सामान्य प्रकरण बहुधा मुहूर्तग्रंथांत असतें. त्यांत कोणत्याही शुभ कृत्यास वर्ज्य अशीं तिथिनक्षत्रादिक असतात. पुढें तिथि, वार, नक्षत्रें, योग, संक्रांति, यांचें शुभाशुभत्व सामान्यतः सांगितलेलें असतें. पुढें गर्भाधानादि पंधरा संस्कारांच्या मुहूर्तांचा विचार असतो. त्यांत विवाहांत वधूवरांचें घटित हें एक मोठें प्रकरण असतें. त्याशिवाय वास्तु, यात्रा ( गमन ), राज्याभिषेक, व दुसरीं कांहीं किरकोळ प्रकरणें असतात. नक्षत्रप्रकरणांत कांहीं ग्रंथांत दुष्टनक्षत्रजननशांति इत्यादि शांतिही † असतात.

---

* नक्षत्रसंबंधें शुभाशुभावरून लांबीरुंदीविषयीं कांहीं नियम बसविले आहेत. व त्यांत बरेंच चातुर्य खर्चिलेलें आढळतें. मुहूर्तमार्तंडांत वास्तुप्रकरणांत क्षेत्रफलादिकांचा बराच विचार आला आहे. तो एकदां मीं एका जोश्यास समजावून दिला, त्यावरून मला दिसलें कीं तो विषय फार थोड्या जोशांस समजत असेल. भूमिति, महत्वमापन, या विषयांची ज्यांस ओळखही नाहीं त्यांस तो विषय समजावा कसा ?

† मुहूर्तविचारांत जन्मलग्नकुंडलीचा किंवा तत्काललग्नकुंडलीचा किंवा दोन्हींचा विचार बऱ्याच स्थलीं येतो. कुंडलीसंबंधें विवेचन पुढें आहे. षड्वर्गांचाही विचार विवाहादिक मुहूर्तांत येतो.

रण आहे. हें बरेंच विस्तृत आहे. यांत घरास जागा कशी असावी, लांकडें कशीं असावीं, निरनिराळ्या कामाच्या उपयोगी अशीं घरें कशीं असावीं, इत्यादि चांगली उपयुक्त माहिती आहे. यावरील टीकेंत उत्पलानें ५ नकाशे दिले आहेत. पुढें दकार्गल यांत भूमींत उदक कोठें लागेल हा विषय मुख्यतः आहे, व त्यासंबंधें भूस्तरविद्येतले काहीं विचार आहेत. सांप्रतही विहीर खणावयाची असतां उदक कोठें लागेल हें सांगणारे कांहीं लोक असतात असें सांगतात. पुढें वृक्षायुर्वेद प्रकरण आहे. यांत उद्भिज्जविचार चांगला आहे. पुढें प्रासादलक्षणप्रकरण आहे. पुढें वज्रलेप म्हणून एक प्रकारचा चुना करण्याचें प्रकरण आहे. हा मयानें सांगितला आहे असें म्हटलें आहे. पुढें देवांच्या प्रतिमांचा विचार ( त्यांचा घडण्याचा प्रकार इत्यादि ) आहे. पुढें वास्तुप्रतिष्ठा आहे. पुढें गाई, कुत्रे, कुक्कुट, कूर्म, अज, मनुष्य, यांचीं लक्षणें, स्त्रीचिन्हें, हे विषय आहेत. पुढें चामर, दंडपरीक्षा; पुढें कामशास्त्रसंबंधें कांहीं विषय; पुढें हिरे, मोतीं, पद्मराग, इत्यादिकांची परीक्षा; पुढें दीपलक्षण, दंतधावन, शकुन, यांचा विचार; पुढें कुत्रीं, कोल्हे, यांच्या शब्दांपासून होणारें शुभाशुभ; हे विषय आहेत. पुढें मृग, हत्ती इत्यादिकांसंबंधें विचार आहे. पुढें तिथिनक्षत्रकरण यांचीं फलें, गोचर ग्रहांचीं फलें, हे विषय आहेत.

संहिताग्रंथ मीं विशेष पाहिले नाहींत. तथापि वराहाच्या पूर्वींच्या गर्गादि सर्व संहितांत हेच किंवा यांतले कांहीं विषय असतात, असें दिसतें. विवाहादि कृत्यांकरितां शुभकाल ( मुहूर्त ) यांचा विचार संहिताग्रंथांतच असतो असें दिसतें. परंतु वराहानें यात्रा आणि विवाह ह्या दोन विषयांवर निराळे ग्रंथ केल्यामुळें या ग्रंथांत ते विषय आले नाहींत, असें दिसतें.

वराहानें जागोजाग अमुक ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें अमुक विषय सांगतों असें म्हटलें आहे. त्यांत **गर्ग**, **पराशर**, **असित**, **देवल**, **वृद्धगर्ग**, **कश्यप**, **भृगु**, **वसिष्ठ**, **बृहस्पति**, **मनु**, **मय**, **सारस्वत**, **ऋषिपुत्र** हीं नांवें आलीं आहेत.* यावरून इतक्या संहिता वराहाच्या वेळीं उपलब्ध होत्या असें दिसतें. यांशिवायही कांहीं असतील; कारण कोठें कोठें त्यानें " अन्यान् बहून ( इतर पुष्कळ ) " असें म्हटलें आहे. टीकाकारानें टीकेंत या सर्व संहितांतील वचनें देऊन शिवायही पुष्कळांचीं दिलीं आहेत. त्यांत **व्यास**, **भानुभट्ट**, **विष्णुगुप्त**, **विष्णुचंद्र**, **यवन**, **रोम**, **सिद्धासन**, **नंदी**, **नग्नजित**, इत्यादिकांचीं आणि भद्रबाहु ग्रंथांतलीं वचनें आलीं आहेत. यांतील कांहीं ग्रंथकार वराहाच्या पूर्वींचे व कांहीं नंतरचे असतील. वास्तुप्रकरणांत किरणाख्य तंत्रांतलीं व मयाचीं वचनें आलीं आहेत.

वरील विषयांवरून दिसून येईल कीं त्यांत सांप्रतचीं अनेक शास्त्रें आलीं आहेत. त्यांचा संबंध केवळ ज्योतिःशास्त्राशींच नाहीं; तर आकाशांत घडणाऱ्या दुसऱ्याही चमत्कारांशीं असून पृथ्वीसंबंधीं अनेक सृष्टचमत्कारही त्यांत आले आहेत. आणखी व्यावहारिक विषयही आले आहेत. यांतील कांहीं विषयांचा विचार वराहाच्या पूर्वीं पुष्कळ काळ झाला होता. व कांहींचा तेव्हांपासून त्याच्या वेळापर्यंत होत आला होता असें दिसतें. बरेच ठिकाणीं वराहानें आपलीं

* यांत सारस्वताचें नांव दकार्गल प्रकरणांत व मयाचें वास्तु व त्यासारख्या प्रकरणांत मात्र आलें आहे.

त्यांतील मुहूर्तस्कंधसंबंधीं ग्रंथ व ग्रंथकार यांचीं नांवें, ज्यांविषयीं यापूर्वीं किंवा पुढें कांहीं उल्लेख आला नाहीं अशीं देतों:-ग्रंथकारांचीं नांवें*-**श्रीधर, ब्रह्मशंभु, योगेश्वराचार्य.** (यांतील शेवटचीं दोन नांवें वास्तुप्रकरणांत आलीं आहेत.) ग्रंथांचीं नांवें—भास्करव्यवहार, भीमपराक्रम, दैवज्ञवल्लभ, आचारसार (हा कदाचित् आचाराचा ग्रंथ असेल), त्रिविक्रमशत, केशवव्यवहार, तिलकव्यवहार, योगयात्रा, विद्याधरी विलास, विवाहपटल, विश्वकर्मशास्त्र (हें नांव वास्तुप्रकरणांत आलें आहे). याशिवाय लघुजातक, यवनजातक, वृद्धजातक, हे जातकग्रंथ; **नरपतिजयचर्या** हा शकुन ग्रंथ; आणि विद्वज्जनवल्लभ हा प्रश्नग्रंथ यांतील वाक्यें आलीं आहेत. टीकेंत वारप्रकरणांत यानें "इह **आनंदपुरे** विषुवच्छाया ५।२० विषुवत्कर्णः १३।८" असें ह्मटलें आहे. यावरून याचें स्थल **आनंदपुर** होय; व हें २४ अक्षांशांवर कोठे तरी आहे.

**राजमार्तंड**--हा **भोज**कृत ग्रंथ आहे. तो शक ९६४ च्या सुमाराचा असावा.

**विवाहवृंदावन** (शक सुमारें ११६५)—मुहूर्तग्रंथांतलें एक प्रकरण विवाह यावर हा ग्रंथ केशव नामक ज्योतिष्याचा आहे. याचें वर्णन पूर्वीं (पृ. २५७, ३१६) आलेंच आहे. रत्नमालाटीकाकार **माधव** याच्या शक ११८५ च्या टीकेंत **केशव** हें नांव आलें आहे. यावरून तो केशव विवाहवृंदावनकारच असावा असें अनुमान होतें. आणि यावरून याचा काल सुमारें शक ११६५ हा ह्मणण्यास जास्त बळकटी येते. माधवटीकेंत केशवव्यवहार असें एक ग्रंथाचें नांव आलें आहे. तोही ग्रंथ कदाचित् याचाच असेल.

**विवाहपटल** (शार्ङ्गधरकृत)—हा विवाहाविषयीं मुहूर्तग्रंथ आहे. यांत **हेमाद्रि, माधव,** हीं नांवें आलीं आहेत, आणि **पीतांबर**कृत विवाहपटलाच्या शक १४४६ च्या टीकेंत याचा उल्लेख आहे. यावरून हा ग्रंथ शक १४०० च्या सुमाराचा असावा. याला सारसमुच्चय असेंही नांव आहे असें दिसतें. गणेशकृत मुहूर्ततत्व-टीकेंत (सुमारें शक १४५०) **शार्ङ्गधर** आणि सारसमुच्चय हीं नांवें आलीं आहेत. यावरूनही शार्ङ्गधराचा काल शक १४०० हून अर्वाचीन नाहीं. यापूर्वीं ज्यांचें कांहीं वर्णन आलें नाहीं अशीं यांत आलेलीं ग्रंथकारादिकांचीं नांवें देतों. ग्रंथकारः-**हरि, गदाधर, मुकुंद, भार्गव, पवनेश्वर लक्ष्मीधरभट.** ग्रंथः—मुक्तावलि, लक्ष्मीधरपटल, गदाधरपटल, रत्नोज्वलसंहिता. हे सर्व ग्रंथ आणि ग्रंथकार बहुधा मुहूर्तस्कंधाचे आहेत.

**मुहूर्ततत्व**—नंदिग्रामस्थ **केशव** याचा हा ग्रंथ आहे. यावरून याचा काल सुमारें शक १४२० असावा. मुहूर्त ग्रंथांतले विषय वर सांगितले ते यांत प्रथम सांगितले आहेतच. परंतु त्यांच्या पुढें 'मुहूर्तखंडः समाप्तः अथ संहिताखंडः' असें ह्मणून पुढें

---

* इतर विषयांवरील ग्रंथकारांचींही वाक्यें प्रसंगवशात् माधवानें दिलीं आहेत. त्या ग्रंथांचीं किंवा ग्रंथकारांचीं नांवें दिलीं असतां उपयोग होईल ह्मणून तीं एथे देतों:—न्यायकिरणावलि, कणादसूत्रें प्रशस्तकरभाष्य, भविष्योत्तरपुराण, मत्स्यपुराण, शिवरहस्य, **बौधायन, गृहस्थ**-धर्मसमुच्चय, स्मृतिमंजरी, सौरधर्मोत्तर, स्कंदपुराण, विष्णुधर्मोत्तर, विश्वरूप, **विज्ञानेश्वर,** पुराणसमुच्चय, **वाग्भट, याज्ञवल्क्यस्मृति, दुर्गसिंह,** गरुडपुराण, विश्वादर्शभाष्य, **वैद्यनिघंट, सुश्रुतचिकित्सित.**

हे जे मुहूर्तग्रंथांतले विषय सांगितले हेच श्रीपतिकृत रत्नमाला या ग्रंथांत आहेत. त्यांशिवाय दुसरे नाहींत. श्रीपतीनें आपल्या ग्रंथास मुहूर्तग्रंथ असें नांव दिलें नाहीं तथापि. पुढें तर मुहूर्तमार्तंड अशाच प्रकारचीं नांवें या ग्रंथांस देऊं लागले. श्रीपतीचा ग्रंथ लल्लकृत रत्नकोशाच्या आधारें रचलेला आहे. यावरून लल्लाच्या ग्रंथांतही मुहूर्ताशिवाय दुसरे विषय नसतील असें वाटतें. व वराहानंतर त्याच्या संहितेसारखा दुसरा ग्रंथ झालेला आढळत नाहीं. यावरून सुमारें शक ५०० किंवा ६०० पासून मुहूर्त हाच तिसरा स्कंध झाला असें दिसतें.

मुहूर्तग्रंथांचे भाग.

नक्षत्रांचीं नांवें व त्यांच्या देवता, अश्विनी इत्यादि नक्षत्रांच्या अश्व इत्यादि कल्पिलेल्या योनि व स्थिरचरादि कल्पित संज्ञा, तसेंच राशींच्या मेषादि संज्ञांवरून बोधित होणारे मेषादि प्राणी, राशींचे भौमादि स्वामि, तिथींच्या नंदादि संज्ञा व तिथींचे स्वामि, या व अशा प्रकारच्या गोष्टींवरून नक्षत्रादिकांचें कर्मविशेषीं शुभाशुभत्व मानिलें आहे. उदाहरण, चर नक्षत्रांवर स्थिर कर्म करणें अशुभ; वधूवरांचीं नक्षत्रें अनुक्रमें रोहिणी आणि उत्तराषाढा असतील तर त्यांच्या योनि सर्प आणि मुंगुस यांचें वैर, ह्मणून अशुभ, इत्यादि.

मुहूर्तांची आवश्यकता.

या मुहूर्तांचा लोकव्यवहाराशीं अत्यंत निकट संबंध आहे. आणि तो अनादिकालापासून चालत आला आहे असें पहिल्या भागांतील अनेक स्थलींच्या विवेचनावरून दिसून येईल. सांप्रत विवाहादि संस्कार तर मुहूर्तावांचून व्हावयाचेच नाहींत. घर बांधण्याचा आरंभ, नूतन गृहप्रवेश, धान्य पेरणें, कापणें, मळणें, इत्यादि कृत्येंही बहुधा मुहूर्तावांचून होत नाहींत. व दुसरींही पुष्कळ व्यावहारिक कृत्यें मुहूर्तानुरोधानें करणारे पुष्कळ लोक आहेत. वैदिकधर्मी लोक मात्र मुहूर्तानुसार कृत्यें करितात असें नाहीं. तर लिंगायत, जैन, या लोकांचेंही मुहूर्तावांचून क्षणभर चालत नाहीं. पार्शी, मुसलमान, या लोकांतही कांहीं व्यवहार मुहूर्तावर चालतात. ज्योतिषाचें ज्ञान आमच्या लोकांस थोडेंसें आल्यावर तें वाढण्यास व आजपर्यंत तें अस्तित्वांत राहण्यास मुहूर्तांची आवश्यकता हें एक मुख्य कारण होय.

मुहूर्तग्रंथांचा इतिहास.

मुहूर्तग्रंथ आणि त्यांचे कर्ते यांचा थोडासा इतिहास देऊन हा स्कंध पुरा करूं. मुहूर्तविषयक ग्रंथ पुष्कळ होऊन गेले असें पुढें लिहिलेल्या थोड्याशा इतिहासावरून दिसून येईल. त्यांत ज्यांची मला प्रत्यक्ष किंवा परंपरया थोडीबहुत माहिती आहे तेवढे मात्र एथे सांगतों.

**रत्नकोश** ( सुमारें शक ५६० )—हा लल्लाचा ग्रंथ आहे. तो मीं पाहिला नाहीं. तरी याच्या आधारानें श्रीपतीनें रत्नमाला रचिली आहे, यावरून हा सांप्रतच्या मुहूर्तग्रंथांसारखाच असेल असें दिसतें.

**रत्नमाला** ( सुमारें शक ९६१ )—हा श्रीपतिकृत आहे. यांत मुहूर्तग्रंथांतले विषय वर सांगितले ते †मात्र आहेत. त्यावर माधवकृत टीका आहे. या माधवाचा काल शक ११८५ आहे. यानें इतर पुष्कळ ग्रंथांतलीं वाक्यें टीकेंत दिलीं आहेत.

---

* या योनींविषयीं रत्नमालाटीकाकार माधव नक्षत्रप्रकरणांत ह्मणतो– "एता योनयः आगमसिद्धा एव दंपत्यादियोगार्थं पूर्वाचार्यैः कल्पिताः न पारमार्थिकाः"

† तथापि टीकाकारानें "संहितार्थं अभिधातुं इच्छुः आह" असें ह्मटलें आहे.

रंभीं संवत्सरफलविचार व ग्रहचार आहे. पुढें मुहूर्तप्रकरण असावें असें दिसतें. ग्रंथकार कण्वशाखी वत्सगोत्री होता. याचें गांव कोंडपल्ली नामक होतें. तेथली विपुवच्छाया ३।३६ आणि देशांतर ४० पूर्व यानें दिलें आहे. **कांची**पर्यंत माझें पंचांग चालतें असें तो म्हणतो. **नरगिरि** येथील नृसिंह हें त्याचें कुलदैवत होतें. **पैलुभटीय**नामक ग्रंथाचा यानें उल्लेख केला आहे.

**मुहूर्तमार्तंड** (शक १४९३)—याचा कर्ता **नारायण** याचें वृत्त पूर्वी (पृ. २७७) दिलें आहे. यानें बापाजवळच अध्ययन केलें असें दिसतें. आपल्या ग्रंथावर स्वतः यानेंच टीका केली आहे. हा ग्रंथ सांप्रत फार प्रचारांत आहे. याचीं निरनिराळ्या वृत्तांचीं १६० पद्यें आहेत. पुष्कळ लोक काव्याप्रमाणें याचें अध्ययन करितात. यांत मुहूर्तग्रंथांतले विषय वर सांगितले आहेत तेवढे मात्र आहेत. तथापि टीकारंभीं " संहितास्कंधं चिकीर्षुः आह " असेंच ग्रंथकारानें ह्मटलें आहे. टीकेंत अनेक ग्रंथकारांचीं वाक्यें आहेत. त्यांपैकीं पूर्वी न आलेलीं मुहूर्तग्रंथकार व ग्रंथ यांचीं नांवें देतों. ग्रंथकार — **गोपिराज, मेघनाथ, म्हालुगी** (हीं नांवें वास्तुप्रकरणांत आहेत). ग्रंथ—उद्वाहतत्व, मुहूर्तदर्पण, कश्यपपटल, संहितासारावलि, व्यवहारसार, शिल्पशास्त्र, बृहद्वास्तुपद्धति, समरंगण, व्यवहारसारस्वत (यांतील शेवटचीं ६ नांवें वास्तुप्रकरणांत आहेत.), रत्नावलि. शिवाय स्फुटकरण (गणितग्रंथ) आणि जातकोत्तम (जातक ग्रंथ) हीं नांवें आलीं आहेत.* हा ग्रंथ सटीक छापलेला आहे.

**तोडरानंद**—हा नीलकंठकृत फार विस्तृत ग्रंथ शक १५०९ च्या सुमाराचा आहे. मीं याचा थोडासा भाग पाहिला त्यांत **चंडेश्वर, यवनेश्वर, दुर्गादित्य** हे ग्रंथकार आणि दैवज्ञमनोहर, व्यवहारोच्चय, कल्पलता हे ग्रंथ इत्यादिकांतलीं वचनें पुष्कळ आलीं आहेत. (पृ. २७५ पहा).

**मुहूर्तचिंतामणि**—**रामभट** नांवाच्या ज्योतिष्यानें शक १५२२ मध्यें हा ग्रंथ केला आहे. या रामभटाचें वर्णन पूर्वी दिलेंच आहे. (पृ. २७८). या ग्रंथांत मुहूर्तग्रंथांतले विषय वर सांगितलेलेच आहेत. हा ग्रंथ बराच प्रचारांत आहे. यावर स्वतः ग्रंथकाराची प्रमिताक्षरा व याचा पुतण्या **गोविंद** याची पीयूषधारा ह्मणून प्रसिद्ध टीका आहे. दोन्ही छापल्या आहेत. पीयूषधारा टीकेंत (शक १५२५) आलेल्या ज्योतिष ग्रंथांचीं यापूर्वी आलीं नाहींत अशीं नांवें:——जगन्मोहन, ज्योतिषरत्नसंग्रह.

**मुहूर्तचूडामणि**—शिवनामक ज्योतिष्यानें हा केलेला आहे. शिवाचें कुलवृत्त पूर्वी दिलें आहे. (पृ. २८३). या ग्रंथाचा काल सुमारें शक १५४० असावा.

**मुहूर्तकल्पद्रुम**—कृष्णात्रिगोत्री **विठ्ठल दीक्षित** यानें हा ग्रंथ केला. त्यावर त्याचीच मुहूर्तकल्पद्रुममंजरी नांवाची टीका शक १५४९ ची आहे.

**मुहूर्तमाला**—विक्रम संवत् १७१७ (शक १५८२, इ. स. १६६०) मध्यें **रघुनाथ**

---

* इतरविषयांवरील ग्रंथांचीं व ग्रंथकारांचीं नांवें:—ब्रह्मपुराण, कात्यायनगृह्यकारिका, कात्यायनगृह्ये हरिहरमिश्रव्याख्या, कालनिर्णयदीपिका सविवरणा, मार्कंडेयपुराण, धनंजय (कोश), अनेकार्थध्वनिमंजरी (कोश), स्मृतिसारावलि, शुल्बसूत्र, हलायुधकोश, धर्मप्रदीप, तीर्थखंड, पितृखंड, प्रेतमंजरी, आदित्यपुराण.

[illegible], [illegible] व दुसरे वराहसंहितेंतले बरेच विषय थोडक्यांत सांगितले आहेत. तथापि ग्रंथकर्त्याच्या वेळीं या विषयांचा कांहीं उपयोग कोणी करीत असतील असें दिसत नाहीं. याच्या ग्रंथांत नौकाप्रकरण हें एक विशेष आहे. हें यात्राप्रकरणापुढें आहे. यांत नौका बांधण्यास आरंभ करणें, ती पाण्यांत प्रथम लोटणें, तिच्यांत बसून जाणें इत्यादिकांचे मुहूर्त सांगितले आहेत. दुसऱ्या कोणत्याही मुहूर्तग्रंथांत हें प्रकरण आढळत नाहीं. यावरील टीकेंत आधारास पूर्वाचार्यांचीं वचनें मुळींच घेतलीं नाहींत. 'नाल' 'सुकाण' या शब्दांचा श्लोकांत उपयोग केला आहे. त्यावर टीकाकार गणेशदैवज्ञ म्हणतो कीं, "लौकिकाविसौ प्रयोगौ गृहीतौ अभिधानादिष्वदृष्टत्वात्." हा समुद्रकांठचा राहणारा असल्यामुळें गलबतवाले कोळी लोक यास मुहूर्त विचारण्यास येऊं लागले असतील त्यावरून त्यानें हें प्रकरण स्वतःचें नवें रचलें असें दिसतें. **नावप्रदीप** म्हणून याचा एक स्वतंत्र ग्रंथही* आहे. मुहूर्ततत्व ग्रंथ सांप्रत प्रचारांत आहे. त्यावर ग्रंथकाराचा पुत्र गणेश दैवज्ञ याची टीका आहे. ती सुमारें शक १४५०ची असावी. ही छापली आहे. या टीकेंतील यापूर्वी न आलेल्या मुहूर्तग्रंथकारांचीं व ग्रंथांचीं नांवें देतों:- ग्रंथकार—**वसंतराज**, **भूपाल**, **नृसिंह**. ग्रंथ—विवाहपटल, ज्योतिःसार, शांतिपटल, संहितादीपक, संग्रह, मुहूर्तसंग्रह, अर्णव, विधिरत्न, श्रीधरीय ज्योतिषार्क, भूपालवल्लभ, ज्योतिषप्रकाश.†

**विवाहपटल** (पीतांबरकृत)-हा ग्रंथ शक १४४४ चा आहे. त्याचे ५२ श्लोक आहेत. त्यांवर स्वतः ग्रंथकाराची निर्णयामृत नांवाची विस्तृत टीका शक १४४६चीं आहे. पीतांबराच्या पित्याचें नांव **राम** आणि पितामहाचें नांव **जगन्नाथ** होतें. तो गौड ब्राह्मण मही नदीच्या मुखावरील **स्तंभतीर्थ** (खंभात) येथील राहणारा होता. ज्यांचें पूर्वी वर्णन आलें नाहीं अशीं या ग्रंथाच्या टीकेंतलीं, ज्योतिष ग्रंथादिकांचीं नांवें‡ देतों. ग्रंथकार—**प्रभाकर**, **वैद्यनाथ**, **मधुसूदन**, **वसंतराज**, **सुरेश्वर**, **वामन**. **भागुरि**, **आशाधर**, **अनंतभट्ट**, **मदन**, **भूपालवल्लभ**. ग्रंथः—चिंतामणि, विवाहकौमुदी, वैद्यनाथकृत विवाहपटल, व्यवहारतत्वशत, रूपनारायणग्रंथ, ज्योतिषप्रकाश, संहिताप्रदीप, चूडारत्न, संहितासार, मौंजीपटल, धर्मतत्वकलानिधि, संग्रह, त्रिविक्रमभाष्य, ज्योतिस्सागर, ज्योतिर्निबंध, संदेहदोषौषध, सज्जनवल्लभ, ज्योतिश्चिंतामणि, ज्योतिर्विवरण, ज्योतिर्विवेक, फलप्रदीप, गोरजपटल, कालविवेक, हे सर्व ग्रंथकार आणि ग्रंथ बहुधा मुहूर्तस्कंधाचे आहेत. यांशिवाय ताजिकतिलक-सामुद्रतिलक, म्हणून ग्रंथ आले आहेत. इतर विषयांच्या ग्रंथांत शब्दरत्नाकर नांवाचा कोश आला आहे.

**ज्योतिषदर्पण**-हा शक १४७९ मध्यें **कंचपल्लु** नामक ज्योतिष्यानें केलेला ग्रंथ आहे. हा गद्यपद्यात्मक आहे. मीं याची प्रत पाहिली ती पूर्ण नव्हती. तींत आ-

---

* डे. का. सं. नं. ३३२ सन १८८२।८३

† इतर विषयांवरील ग्रंथांचीं नांवें—भागवत, आश्वलायनगृह्यकारिका, पद्मपुराण, स्मृत्यर्थसार, स्मृतिरत्नावलि, नैषधकाव्य, नृसिंहप्रबंध.

‡ मुहूर्ततत्वटीका सुमारें याच टीकेच्या वेळची आहे. परंतु तिचा नक्की शक दिलेला नाहीं. दिला आहे, म्हणून तींतलीं ग्रंथादिकांचीं नांवें हींत आलेलीं पुनः दिलीं आहेत.

ग्रंथाचें असें वर्णन आहे:—हा ग्रंथ **भोज**कृत ( ह्मणजे शक ९६४ च्या सुमाराचा ) आहे. त्यांत १ लाभालाभ, २ शत्रुगमागम, ३ गमागम, ४ प्रेषितागम, ५ यात्रा, ६ जयपराजय, ७ संधि, ८ आश्रय, ९ बंधाबंध, १० रोगी, ११ कन्यालाभ, १२ गर्भधारणा, १३ जन्म, १४ वृष्टि, १५ क्षितधन, १६ ( खंडित ), १७ मिश्र, १८ चिंता अशीं प्रकरणें आहेत. सर्वांमिळून सुमारें १७५ श्लोक आहेत. राजमार्तंड हा एक संहितास्कंधाचा ग्रंथ असतां हा दुसरा **भोजानें** कां केला अशी शंका येते; तथापि हा दुसरे कोणाचा असला तरी शक ११८५ चा पूर्वींचा आहे यांत संशय नाहीं. कारण **माधव**कृत रत्नमालाटीकेंत ह्याचें नांव आहे.

**अद्भुतसागर**—मिथिलामंडलाचा राजा **लक्ष्मणसेन** याचा पुत्र महाराजाधिराज **बल्लाळसेन** यानें हा ग्रंथ केला आहे. बल्लाळसेन हा शक १०८२ मध्यें सिंहासनारूढ झाला आणि त्यानें शक १०९० मध्यें हा ग्रंथ केला असें यांत आहे. ह्यांत वराहसंहितेसारखे विषय आहेत; त्यापेक्षां नवीन कांहीं यांत आहे कीं नाहीं हें मीं पाहिलें नाहीं, तथापि ग्रंथ पहाण्यासारखा आहे असें सुधाकर लिहितात. यांतील अध्यायांस आवर्त अशी संज्ञा आहे. "बुधभार्गवाच्छादनावांचून सूर्यावर छिद्र दिसलें तर परचक्र येतें," असें ग्रहणासंबंधी आवर्तांत ह्मटलें आहे. यावरून बुधशुक्रकृत सूर्यबिंबभेद माहीत होता असें दिसतें; आणि यावांचून छिद्र ह्मणजे सूर्याचे डागच होत. "दोन्ही अयनें केव्हां होतात हें मीं यथावत् पाहिलें आहे [ आणि त्यावरून अयनांश निश्चित केले ]" असें यानें लिहिलें आहे. यावरून याची शोधकता दिसून येते. या ग्रंथांत अनेक ग्रंथकारादिकांचीं नांवें आलीं आहेत. त्यांत **वसंतराज, प्रभाकर** हे ग्रंथकार आणि वटकणिका, विष्णुधर्मोत्तर, भागवत, हे ग्रंथ आहेत.

**व्यवहारप्रदीप**—या नांवाचा संहितामुहूर्तस्कंधाचा एक चांगला ग्रंथ **पद्मनाभ**कृत आहे. **यमुनापुर** नगरांतील **शिवदास**नामक ब्राह्मणाचा पुत्र **गंगादास** याचा पुत्र **कृष्णदास** याचा **पद्मनाभ** हा पुत्र होय. याच्या ग्रंथांत भीमपराक्रम, श्रीपतिकृत रत्नमाला, दीपिका, रूपनारायण, राजमार्तंड, सारसागर, रत्नावलि, ज्योतिस्तंत्र ( गणितग्रंथ ), व्यवहारचंडेश्वर, मुक्तावलि, यांतील वचनें आहेत. भास्करानें एक बीजगणितकार **पद्मनाभ** लिहिला आहे, तोच हा असें **सुधाकर** ह्मणतात. परंतु बीजगणितकार पद्मनाभ शक ७०० च्या पूर्वीं झाला असें मागें ( पृ. २२९ ) दाखविलें आहे. आणि व्यवहारप्रदीपांत रत्नमाला, राजमार्तंड यांचा उल्लेख आहे. यावरून तो शक ९६४ नंतर झाला हें उघड आहे. पद्मनाभाच्या ग्रंथांत सूर्यसिद्धांत, वराहसंहिता, इत्यादिकांतील वचनें आहेत तीं सांप्रतचा सूर्यसिद्धांत इत्यादिकांत आहेत; परंतु त्याचा एक श्लोक आणि त्यानें शौनकसंहिता, वसिष्ठसंहिता आणि ज्योतिस्तंत्र यांतला ह्मणून दिलेला एकेक श्लोक असे चार श्लोक सिद्धांतशिरोमणींत* आहेत, यावरून भास्करानें ते त्या त्या ग्रंथांतून घेतले असें सुधाकर ह्मणतात. परंतु त्या श्लोकांच्या स्वरूपावरून पद्मनाभाचेंच लिहिणें मला अविश्वसनीय दिसतें; आणि तो शक १०७२ नंतर झाला असें मला वाटतें.

---

* 'तुष्यंतु' गणिताध्याय मध्यमाधिकार श्लो. ९; 'दिव्यं ज्ञान॰'. गोलाध्याय छेद्यक श्लो. ५; 'घ्ने वेद॰' गोल श्लो. ८; असंक्रा॰' मध्यममाधि॰ श्लो. ६

नामक ज्योतिष्यानें काशी एथे हा ग्रंथ केला. रघुनाथ हा शांडिल्यगोत्री चितपावन ब्राह्मण होता. याचे पूर्वज दक्षिण कोंकणांत दाभोळच्या दक्षिणेस पालशेत एथे राहत असत. याच्या आजाचें नांव केशव. बाप नृसिंह हा काशी एथे जाऊन राहिला. हा अकबर बादशहाच्या पदरीं होता. अकबरानें आसेरि किल्ला घेतला, तेव्हां नृसिंहास ज्योतिर्वित्सरस अशी पदवी मिळाली.

जिना दाराशाहे सुजाशाहे मुरादशाहे च ॥
अवरंगजेबशाहे जगत्यवनीं समाश्रयोगः ॥

असा वृत्तांत ग्रंथकारानें दिला आहे. हा ग्रंथ छापला आहे.

मुहूर्तदीपक–शके १५८३ मध्यें महादेव नामक ज्योतिष्यानें हा ग्रंथ केला. महादेव हा भुज (कच्छ) एथे राहणारा होता. याच्या बापाचें नांव कान्हजि होतें. रैवतकराजप्रतिपद असें यानें बापाविषयीं ह्मटलें आहे. अमुक अमुक ग्रंथ पाहून हा ग्रंथ करितों असें त्यानें लिहिलें आहे, त्यांत पूर्वी न आलेले व्यवहारप्रकाश, राजवल्लभ, हे आहेत. हा ग्रंथ छापला आहे. यावर स्वतः ग्रंथकाराचीच टीका आहे. तींत वर न आलेले अमृतकुंभ, लक्षणसमुच्चय, सारसंग्रह हे ग्रंथ आले आहेत असें आफ्रेच लिहितो.

मुहूर्तगणपति–विक्रम संवत् १७४२ (शक १६०७) मध्यें गणपतिनामक ज्योतिष्यानें हा ग्रंथ केला. यानें आपल्या वृत्तांतांत असें म्हटलें आहे:—

गौडोर्वीशशिरोविभूषणमणिर्गोपालदासोऽभवत्
मांधातेन्द्वभिरक्षितात्ममहिमा ख्यातिं स दिल्लीश्वरात्[*] ॥
तत्पुत्रो विजयी मनोहरनृपो विद्योतते सर्वदा ॥

ह्या मनोहर राजास "गौडान्वयकुमुदगणानंदिचंद्र" असेंही ग्रंथकारानें ह्मटलें आहे. त्याचा पुत्र युवराज राम याच्या इच्छेवरून हा ग्रंथ केला. ग्रंथकार हा भारद्वाज गोत्री औदीच्य गुर्जर ब्राह्मण होता. याचें उपनांव रावल असें होतें असें दिसतें. याच्या बाप इत्यादि पूर्वजांचीं नांवें अनुक्रमें हरिशंकर, रामदास, यशोधर, ब्रह्मर्षि हीं होतीं. हा ग्रंथ छापला आहे.

मुहूर्तसिंधु–पुणें येथील वे. शा. गंगाधरशास्त्री दातार (जन्म शक १७४४ समाधि शक १८१०) यांनीं मुहूर्तसिंधु ह्मणून एक संस्कृतमराठी ग्रंथ शक १८०५ मध्यें केला आहे. यांत मुहूर्तादिक आणि त्यांचे अपवाद प्रत्यपवाद यांचा निरनिराळ्या सुमारें ३८ ग्रंथांतील वचनांच्या आधारें सविस्तर विचार केला आहे. हा ग्रंथ छापला आहे.

या ग्रंथाचीं ४७२ पृष्ठें छापून झाल्यावर आणखी कांहीं संहितामुहूर्तग्रंथांची माहिती मिळाली ती एथे देतों.

विद्वज्जनवल्लभ – तंजावर एथील महाराष्ट्र राजकीय[†] पुस्तकालयाच्या यादींत या

---

[*] हा अवरंगजेब असला पाहिजे.

[†] शिवाजीचा भाऊ वेंकोजी (एकोजी) आणि त्याचे वंशज यांनीं तंजावर प्रांतांत राज्य केलें. तंजावर एथे या राजांच्या वाड्यांत पुस्तकसंग्रह फार चांगला आहे. मद्राससरकारच्या हुकुमावरून त्याचा क्याटलाग बर्नेल (A. C. Burnell) यानें केलेला १८७९ मध्यें छापला आहे. या वंशांत तुळाजी ह्मणून राजा इ० स० १७६५ पासून १७८८ पर्यंत गादीवर होता. त्यानें केलेले (अथवा करविलेले) ही ग्रंथ त्या पुस्तकालयांत आहेत. हा संग्रह मुख्यतः याच्याच वेळीं झाला असावा.

## ३ जातकस्कंध.

लक्षण.

एकाद्या मनुष्याच्या जन्मकालीं जें लग्न असेल त्या लग्नीं किंवा लग्नापासून इतर स्थलीं ग्रह असतील त्याप्रमाणें, किंवा जन्मकालीं चंद्र ज्या राशीस असेल त्या राशीसंबंधें जसे ग्रह असतील त्याप्रमाणें, किंवा जन्मकालीन तिथिनक्षत्रादिकांप्रमाणें, सारांश जन्मकालच्या ग्रहस्थितीप्रमाणें त्या मनुष्यास त्या जन्मांत अमुक सुखदुःखादि होतील याचा निर्णय ज्या शास्त्रावरून होतो त्यास **होराशास्त्र** किंवा **जातक** असें ह्मणतात. याच शाखेची ताजिक ह्मणून एक पोटशाखा पुढें झाली, तिचें विवेचन पुढें करूं. प्रथम जातकाविषयीं विवेचन थोडक्यांत करितों.

बाजूस आकृति काढली आहे हिला **कुंडली** ह्मणतात. जन्मकालीन लग्नाचा* राश्यंक एक (१) यावरांत लिहितात. त्या स्थानास पहिलें स्थान ह्मणतात; मग त्या स्थानीं बारा राशींपैकीं कोणताही राशि येवो. कुंडलींत दोन, तीन, इत्यादि अंक मांडले आहेत, त्या त्या स्थानांस दुसरें, तिसरें, इत्यादि ह्मणतात. आणि त्या त्या राशीस जन्मकालीं जे ग्रह असतील ते त्या स्थानीं लिहितात. ह्या बारा स्थानांस अनुक्रमें तनु, धन, सहज, सुहृत्, सुत, रिपु, जाया, मृत्यु, धर्म, कर्म, आय, व्यय, अशा संज्ञा आहेत. या संज्ञांनीं बोधित होणाऱ्या व त्यासंबंधाच्या इतर सर्व गोष्टींचा विचार त्या त्या स्थानच्या राशींच्या ग्रहांवरून व इतर ग्रहांचा त्या स्थानाशीं दृष्ट्यादि संबंध असेल त्यावरून करितात. उदाहरणार्थ, पत्नीसंबंधें सर्व फलांचा विचार सातव्या स्थानावरून करितात. या बारा स्थानांस दुसऱ्याही पुष्कळ संज्ञा आहेत. जन्मांत या बाराच गोष्टींच्या संबंधें सुखदुःख होतें असें नाहीं; परंतु ह्या सामान्य संज्ञा आहेत. ज्या गोष्टीचा विचार करावयाचा असेल ती १२ पैकीं कोणत्यातरी स्थानीं कल्पिलेली असते. उदाहरणार्थ, राजाशीं संबंध असणाऱ्या बहुतेक गोष्टींचा विचार १० व्या स्थानावरून करितात. बहुतेक फलांचा विचार जन्मलग्नकुंडलीवरून करतात. क्वचित् राशिकुंडलीवरून ह्मणजे जींत जन्मराशि प्रथमस्थानीं मांडला आहे अशा कुंडलीवरून करितात. कुंडलीचे दुसरेही कांहीं प्रकार कल्पिले आहेत. अमुक राशि हें अमुक ग्रहाचें स्वगृह अथवा उच्च असें कल्पिलें आहे. कर्क आणि सिंह हीं यथाक्रम चंद्र आणि रवि यांचीं स्वगृहें. पुढें यांच्या दोन बाजूंचे मिथुन आणि कन्या हे दोन राशि हीं बुधाचीं स्वगृहें, त्याच्या पलीकडील वृषभ आणि

---

* जन्मलग्न ह्मणजे जन्मकालीं जी रास क्षितिजांत असेल ह्मणजे उदय पावत असेल ती. लग्नकुंडली जमिनीवर लंबसंस्थ क्रांतिवृत्ताच्या पातळींत धरावी. लग्न पूर्वबाजूस आणि सातवें स्थान पश्चिमबाजूस धरावें. ह्मणजे तीच इष्टकालची आकाशांतली ग्रहस्थिति होय. त्यांत वरचें अर्ध उदय पावलेलें आणि खालचें अस्त पावलेलें असतें. दहावें स्थान खमध्य आणि चवथें हें अगदीं खालचें पाताळांतलें स्थान होय.

ज्योतिर्विदाभरण—हा मुहूर्तग्रंथ आहे. हा गतकलि ३०६८ या वर्षी रघुवंश इत्यादि ग्रंथ करणाऱ्या कालिदासानें केला असें यांत लिहिलें आहे. परंतु तें खोटें आहे. ( पृ २१२ पहा ). ऐंद्रयोगाचा तिसरा अंश गत असतां रविचंद्रक्रांतिसाम्य होतें असें यांत आहे. यावरून तर त्याचा काल सुमारें शक ११६४ ठरतो. याचा कर्ता कालिदास असल्यास तो रघुवंशकाराहून निराळा.

ज्योतिर्निबंध—हा धर्मशास्त्रपर मुहूर्तग्रंथ शिवदास यानें केलेला आहे. पीतांबरकृत विवाहपटलटीकेंत याचा उल्लेख आहे. यावरून हा शक १४४६ च्या पूर्वीचा आहे.

ज्यांच्या कालाविषयीं कांहीं तरी ठाऊक आहे अशा ग्रंथांचें वर्णन वर केलें. आणखी मुहूर्तग्रंथ अनेक आहेत.

सांप्रत पंचांगांत संवत्सरफलें लिहितात, तीं या प्रांतांत बहुधा कल्पलता या ग्रंथावरून लिहितात. हा ग्रंथ शक १५६४ मध्यें जलदग्रामवासी रुद्रभटात्मज सोमदैवज्ञ यानें रचिला. राजावलि ग्रंथांतूनही कोणी फलें लिहितात. इतर कांहीं प्रांतांत जगन्मोहन, नरेंद्रवल्ली, समयसिद्धांजन, इत्यादि ग्रंथांवरून लिहितात.

शकुन—हें एक संहितास्कंधाचेंच अंग होय. यावर नरपतिजयचर्या नांवाचा बराच प्राचीन ह्मणजे विक्रम संवत् १२३२ (शक १०९७) मधील ग्रंथ आहे. हा नरपति यानें अह्निलपट्टण एथें केला. नरपति हा जैन होता असें दिसतें. त्याचा बाप आम्रदेव हा धारा नगरींत राहणारा मोठा विद्वान् होता. या ग्रंथांत स्वरावरून शुभाशुभफलज्ञान मुख्यतः राजांच्यासंबंधें सांगितलें आहे. याची ग्रंथसंख्या ४५०० ग्रंथकारानें सांगितली आहे. या ग्रंथास स्वरोदय आणि सारोद्धार अशींही नांवें आहेत असें दिसतें. कोणकोणते ग्रंथ पाहून ग्रंथ केला याविषयीं आरंभीं असें लिहिलें आहे.

> ब्रह्मादौ यामलान् सप्त तथा युद्धजयार्णवं ॥ कौमारीकौशलं चैव योगिनीं योगसंभवं ॥ ४ ॥
> रक्तादिमूर्तिकं ( रक्ताक्षं तंत्रमुख्यं ) च स्वरसिंहं स्वरार्णवं ॥ भूबलं गारुडं नाम लंपटं
> स्वरभैरवं ॥ ५ ॥ तंत्रबलं ता स्वयं ( तंत्रं रुणांगं दाक्षं ) च सिद्धांतं जयपद्धतिं ॥
> पुस्तकेंद्रं घटाकर्णादर्पणं ज्योतिषार्णवं ॥ ६ ॥ सारोद्धारं प्रवक्ष्यामि

यांशिवाय वसंतराज ग्रंथकार व गणितसार आणि चूडामणि* हे ग्रंथ यांचींही नांवें आलीं आहेत. यावरून हे सर्व शक १०९७ च्या पूर्वीचे आहेत. नरपतिजयचर्या ग्रंथावर हरिवंशकृत जयलक्ष्मी नांवाची टीका आहे; तसेंच नरहरि, भूधर, रामनाथ यांच्या टीका आहेत†. नैमिष क्षेत्रांत राहणारा सूर्यदासपुत्र राम वाजपेयी‡ याचा स्वरशास्त्रावर समरसार नांवाचा ग्रंथ आहे. त्यावर त्याचा बंधु भरत याची टीका आहे. हें स्वरशास्त्र ह्मणजे मुख्यतः नाकांतून निघणाऱ्या वायूवर बसविलेलें शास्त्र आहे. त्यावर आणखीही पुष्कळ ग्रंथ आहेत.

---

* राजमार्तंडांत चूडामणीचा उल्लेख आहे. यावरून तो मुहूर्तग्रंथ शक ९६४च्या पूर्वीचा आहे.

† नरपतिजयचर्येविषयीं ही सर्व माहिती निरनिराळ्या ५ ग्रंथांतून घेतली आहे. ज्योतिषकल्पवृक्ष नांवाच्या ग्रंथांत तीं सर्व ज्योतिषगणित सांगितलें आहे असें नरपति ह्मणतो.

‡ या रामाचा करणचिंतामणि ह्मणून एक करणग्रंथ आहे असें तो ह्मणतो. तसेंच त्याचा मुहूर्तकर्णी एक ग्रंथ आहे. तो शक १३७१ चा आहे.

होते. पुढें महाड कोर्टांत होते. ह्मणून त्यांस महाडकर ह्मणतात. इ. स. १८९२ पासून नोकरी सोडून ते इचलकरंजी एथे व मुख्यतः कोल्हापूर एथे वकिली करितात. त्यांचा बहुतेक वेळ इतर व्यवसायांत जातो. इ. स. १८८२ मध्यें त्यांस एक द्राविड ब्राह्मण ज्योतिषी भेटला. तो विक्षिप्त होता. मनुष्याच्या शारीरलक्षणांवरून जन्मलग्न सांगण्याचीं कांहीं मूलतत्वें त्यानें पटवर्धनांस सांगितलीं. पुढें त्यांनीं स्वतः अनेक ग्रंथ पाहून त्यांतल्या लक्षणांची एकवाक्यता झाली तितकी करून व स्वतः शेंकडों मनुष्यें पाहून नियम बसवून आपलें ज्ञान वाढविलें. इ. स. १८९१ पासून त्यांच्या या ज्ञानाची प्रसिद्धि झाली. मुखचर्या पाहून कुंडली मांडण्याच्या कामीं यांची बुद्धि मोठी तीव्र आहे. मनुष्य पाहतांच हां हां ह्मणतां त्याची कुंडली मांडितात. ती मुख्यतः मुखचर्या पाहून व कधीं जीभ आणि तळहात पाहून मांडितात. शारीरलक्षणांवरून जन्मलग्न आणि जन्मकाळीं अमुक ग्रह अमुक राशीस होता एवढेंच हे सांगतात असें नाहीं;तर अमुक ग्रह अमुक राशीस अमुक अंशांवर होता इतकें सांगतात. अंशांत फार तर सरासरी एकदोन अंशांची चूक पडते, असा अनुभव मीं पाहिला आहे. नेहमींच अंश सांगतात असें नाहीं; बहुधा नुस्ता राशि सांगतात. जन्मलग्न कुंडली पाहून, ती ज्याची असेल तो मनुष्य डोळ्यांसमोर असेल तर त्याचा जन्मकाल ज्यास ज्योतिषगणिताची माहिती आहे असा कोणीही ज्योतिषी सांगेल. गुरु एकदां ज्या राशीस असेल त्या राशीस पुनः १२ वर्षांनीं येतो, शनि ३० वर्षांनीं येतो, रवि चैत्रादिक महिन्यांत मेषादिक राशीस येतो, चंद्रसूर्यांच्या अंतरावरून तिथि निघते, या नियमांवरून कुंडलीवरून जन्मकाल सांगतां येईल हें उघड आहे. मनुष्याचा जन्मकाल सांगितला असतां त्यावरून ज्योतिषगणितानें त्या वेळचें लग्न आणि ग्रह काढितां येतात. परंतु पटवर्धनांस शारीरलक्षणांवरून लग्न आणि ग्रह समजतात. ह्मणजे जन्मकाळीं कोणता राशि उगवत होता, कोणता ग्रह आकाशांत कोणत्या स्थानीं होता हें समजतें. तें कुंडलींत मांडिलें ह्मणजे त्यावरून वर सांगितल्याप्रमाणें जन्मकाल सांगतां येतो.

यावरून असें निष्पन्न होतें कीं मनुष्याच्या जन्मकाळची आकाशांतली ग्रहांची स्थिति आणि त्या वेळीं उदय पावत असलेला राशि ( लग्न ) यांस अनुसरून मनुष्याच्या शरीरावर कांहीं लक्षणें उत्पन्न झालेलीं असतात. ह्मणजे मनुष्याशीं ग्रहांचा संबंध आहे असें सिद्ध झालें. या विषयावर अनेक शंका निघतात. त्या सर्वांचा एथे विचार करण्याचें कारण नाहीं.* आणि पटवर्धन यांस साधलेली विद्या अवगत झाल्याशिवाय या गोष्टीबद्दल पूर्ण विचार करितां यावयाचा नाहीं. तथापि संभवनीय शंकांचा मला करितां येण्याजोगा आहे तितका विचार केल्यावरून माझा वर लिहिलेला सिद्धांत झाला आहे.

पटवर्धन हे लोकांस बहुधा नुस्ता जन्मकाळ सांगतात व कांहीं फळें सांग तात परंतु हें कसें सांगतात हें कांहीं लोकांस समजत नाहीं यामुळें पटवर्धनांच्या विद्येचें महत्व त्यांस समजत नाहीं. मंत्रसिद्धीच्या साह्यानें जन्मकाळ सांगतां येत असेल असेंही कोणास वाटतें. परंतु ही समजूत चुकीची आहे. शारीरलक्षणांवरून लग्न

---

* कोणाच्याही शंकांचें समाधान करण्यास पटवर्धन तयार आहेत. ते या कामीं कांहीं घेत नाहींत हें प्रसिद्धच आहे.

तुळा हीं शुक्राचीं, त्याच्या पलीकडील मेष, वृश्चिक हीं भौमाचीं, त्याच्या दोहोंकडचीं मीनधनु गुरूचीं आणि मकर कुंभ हीं शनीचीं स्वगृहें मानिलीं आहेत. उच्चांत मात्र क्रम नाहीं. गणितांतलीं उच्चें निराळींच आहेत. सूर्याचें गणितांतलें उच्च सांप्रत निरयन मिथुन आणि सायन कर्क आहे. परंतु जातकांत मेष हें रवीचें उच्च आहे. हीं उच्चें कोणत्या धोरणानें मानिलीं हें समजत नाहीं. सायन उच्चास बरीच गति आहे. जातकांत मानिलेलीं उच्चें हीं कक्षेंतलीं उच्चें सायनमानानें होतीं तेव्हां ठरविलीं असें कांहीं लोकांचें ह्मणणें आहे. निरयनमतीयांस तें मान्य होणार नाहींच; परंतु तें मानलें तरी कालाच्या संबंधें मला तें संभवनीय वाटत नाहीं कारण रवीचें उच्च सायन मेषीं शकापूर्वी सुमारें ४१०० पासून २३०० पर्यंत होतें. भौमाचें जातकोक्त उच्च मकर होय. त्याचें कक्षेंतलें उच्च सायन मकरीं शकापूर्वी ११५०० पासून ९,००० पर्यंत होतें, त्या अलीकडे कधीं नव्हतें. परंतु इतक्या प्राचीनकालीं जातकशास्त्रच होतें कीं नाहीं याची शंका, मग वरील कल्पनेस थारा कोठला? इतक्या प्राचीन कालीं मेषादि संज्ञा होत्या, ग्रहांचें ज्ञान होतें, इतकेंच नाहीं, तर ज्योतिषगणित आणि जातक यांचें उत्तम ज्ञान होतें, असें मानणाऱ्या कांहीं व्यक्ति आहेत. परंतु मला तें संभवनीय दिसत नाहीं. असो. ग्रहांचें परस्परांचें मित्रत्व, शत्रुत्व इत्यादि कल्पिलें आहे. ग्रह स्वगृहीं व उच्चीं असतां उत्तम फलें देतात; नीचीं अथवा शत्रुगृहीं असतां निराळें फळ, वक्री असतां निराळें; ग्रहाची इतर स्थानांवर दृष्टि असेल त्याप्रमाणें कमजास्त अथवा बरें वाईट फल; इत्यादि गोष्टी कल्पिल्या आहेत. त्यांतल्या कांहीं कल्पना व्यवहारानुसार दिसतात; परंतु कांहींचें धोरण काय हें सांगतां येत नाहीं. फलादिकांसंबंधें सर्व ग्रंथकारांचें एक मत आहे असें नाहीं. पुष्कळ मतभेद आढळतात. सांप्रत युरोपांत सायन राशींवरून फलें पहातात. माधवराव ब्रह्माजी आणि जीवनराव त्र्यंबकराव चिटणीस* इत्यादिकांचें असें ह्मणणें आहे कीं आमच्या ग्रंथांतलीं फलें निरयन मानापेक्षां सायनमानानें चांगलीं अनुभवास येतात.

ग्रहांशीं मनुष्याचा संबंध.

आकाशांतल्या ग्रहांचा मनुष्याच्या जीविताशीं संबंध कसा असूं शकेल अशी शंका पुष्कळांस येते व ती येणें साहजिक आहे. परंतु तो संबंध आहे अशी माझी खात्री झाली आहे. तो कसा असावा हें सध्या सूक्ष्मपणें सांगतां येत नाहीं. परंतु आहे ही गोष्ट खरी. मनुष्याच्या शारीरलक्षणांवरून त्याचें जन्मलग्न सांगणारे पटवर्धन ज्योतिषी यांचें वर्णन पुढें दिलें आहे त्यावरून या गोष्टीचें स्पष्टीकरण होईल.

**नानाजी काशिनाथ पटवर्धन**—हे महाडकर या नांवानें विशेष प्रसिद्ध आहेत. यांचें जन्म शक १७८७ वैशाख कृष्ण १४ धनुर्लग्नीं चिपळुणाजवळ पाचेरी सडा ऊर्फ गोभार येथें झालें. यांस जातकशास्त्राचें जें अश्रुतपूर्व ज्ञान आहे तें बहुतेक स्वसंपादित आहे. यांचे वडील १३ व्या वर्षी निवर्तले. यांचा मराठी अभ्यास प्रथम इ. स. १८७७ मध्यें गणपति पुळें एथे व १८७८ पासून १८८० पर्यंत मालगुंड एथे व पुढें १८८२ पर्यंत ठाणें एथे नं. १च्या शाळेंत झाला. पुढें त्यांस इ. स. १८८३ मध्यें अलिबाग जिल्ह्यांत कोर्टाकडे नोकरी मिळाली. ते १८८६ पर्यंत अलिबाग कोर्टांत

* हे दोघे हल्लीं मुंबईस असतात. पृ. ४१८ पहा.

जातकशास्त्राचीं मूल तत्त्वें प्रथम ज्यांनीं ठरविलीं; अमुक लग्नावर जन्मलेल्या मनुष्याचीं लक्षणें अमुक; मनुष्याच्या शरीराचा विचार कुंडलींतल्या पहिल्या स्थानावरून करावा, पत्नीचा सातव्यावरून करावा, संपत्तीचा अमुक स्थानावरून करावा, हातावर अमुक रेषा अमुक प्रकारची असली ह्मणजे जन्मकाळीं सूर्य अमुक राशीस होता असें समजावें, असे नियम प्रथम ज्यांनीं ठरविले, ते धन्य होत. सध्या आपल्यास इतकें ह्मणण्यास हरकत नाहीं कीं जातकशास्त्र कांहीं तरी आधारावर रचलेलें आहे आणि मनुष्याचा ग्रहांशीं संबंध आहे.*

जातकग्रंथांचें पूर्ण स्वरूप थोडक्यांत सांगतां येणें कठीण आहे. ह्मणून या स्कंधाचा इतिहास मात्र थोडक्यांत सांगतों.

इतिहास.

जातकस्कंधावर सांप्रत उपलब्ध असलेले दैवी ग्रंथ गौरीजातक आणि कालचक्रजातक अथवा कालजातक आणि अपौरुष किंवा आर्ष असे ग्रंथ पाराशरी, जैमिनीसूत्र, भृगुसंहिता, इतके मला माहीत आहेत. पाराशरींत बृहत् आणि लघु असे दोन प्रकार आहेत. जातक स्कंधावर उपलब्ध पौरुषग्रंथांत प्राचीनतम ग्रंथ ह्मटला ह्मणजे वराहमिहिराचा बृहज्जातक होय. याच्या शेवटीं त्यानें

मुनिमतान्यवलोक्य सम्यक् होरां वराहमिहिरो रुचिरां चकार ॥

उपसंहाराध्याय.

असें ह्मटलें आहे. मध्येंही एकदां (अध्या ६ श्लो. १०) त्यानें "मुनिगदितं (मुनींनीं सांगितलें आहे)" असं ह्मटलें आहे. **पराशराचा** त्यानें दोनदां उल्लेख केला आहे. बृहत्संहितेंत ग्रहगोचराध्यायांत **मांडव्याचा** उल्लेख केला आहे. तसेंच बृहज्जातकटीकाकार **भटोत्पल** यानें **गार्गी, बादरायण, याज्ञवल्क्य, मांडव्य** यांचीं वाक्यें जातकसंबंधाचीं दिलीं आहेत. त्यांत गार्गीचीं तर पुष्कळच आहेत. यांचे

---

* जातकाच्या संबंधें सायनमान निसर्गसिद्ध आहे कीं निरयन तसें आहे याचा निर्णय पटवर्धनांच्या विद्येवरून होईल तर पहावा, ह्मणून मीं शक १८१५ पासून बराच प्रयत्न व विचार केला. परंतु तो निर्णय सध्या होईलसें दिसत नाहीं. शारीरलक्षणांवरून पटवर्धनांस समजणारे कांहीं ग्रह सापेक्ष असतात. उदाहरण अमुक मनुष्याच्या जन्मकाळीं रवि आणि बुध यांमध्यें २ अंश अंतर होतें, लग्नापासून अमुक स्थानीं अमुक ग्रह होता, असें त्यांस चेहरा पाहून समजतें; यावरून कांहीं निर्णय होत नाहीं. दुसरें मुख्य असें कीं पटवर्धनांनीं हल्लीं लक्षणें बसविलीं आहेत तीं प्रथम पटवर्धनीं पंचांगावरून बसविलीं आहेत. उदाहरण अमुक लक्षण असतां पटवर्धनी पंचांगावरून अमुक लग्नाचे किंवा अमुक ग्रहाचे अमुक अंश येतात असा अनुभव अनेक उदाहरणांत पाहून तसें लक्षण जेथे आढळेल तेथे तितकें लग्न किंवा ग्रह सांगावयाचा असे नियम त्यांनीं बसविले आहेत. हे नियम प्रथमच सायन पंचांगावरूनच बांधितां आले असते. सायननिरयनाचा भेद आणि पटवर्धनांची विद्या हीं दोन्ही ज्यांना चांगलीं अवगत आहेत अशा मनुष्यांनीं पांच सहाशें वर्षें अनुभवाचें काम चालविलें तर तितक्या काळांत सायननिरयन ग्रहांच्या अंतरांत सात आठ अंश वाढतील, आणि त्यावरून निर्णय होईल. पटवर्धन हे मुखचर्यादिकांवरून ग्रहाचे जे राश्यंश हल्लीं मांडितात त्यांपेक्षां सायन राश्यंश सुमारें १८ अंश जास्त असतात. पटवर्धनांचे नियम कायम राखून ६०० वर्षांनीं मुखचर्येवरून येणारा ग्रह आणि गणितागत सायन ग्रह यांत १८ अंशच अंतर येईल तर जातकासंबंधें सायनमान निसर्गसिद्ध ठरेल. आणि तें अंतर सुमारें २६ अंश येईल तर शुद्ध नाक्षत्र ( निरयन ) मान निसर्गसिद्ध ठरेल. फलें सांगण्यास ग्रहांचीं उच्चें, स्वगृहें आणि ग्रहांचे तत्कालीन राशि आणि लग्न हीं सर्व पटवर्धन हे निरयन घेतात. तथापि तेवढ्यावरून सध्या कांहीं निर्णय ठरवितां येत नाहीं.

